


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# दीपावली

'अजून'

विशेषांक



ऑगस्ट १९६६ ■ वर्ष २२ वें ■ मूल्य दीड (१॥) रुपया

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment AUGUST 1966

DIPAVALI MONTHLY



COVER PRINTED AT ASHA PRINTERY, BOMBAY-4.

अनुक्रमणिका

भारत सरकारचे १९६५ चे
श्रेष्ठता प्रमाणपत्र
मिळविणारे एकमेव
मराठी मासिक

# दीपावली



ऑगस्ट १९६६ • वर्ष २२ वे • मूल्य १।। रु.

# अजून विशेषांक

## श्रेयनामावलि–



**दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

Gram : Dalalart
टे. नं. ३५७७६५

● संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १।। रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकास रु. १२।।. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.
Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40–42, Kennedy Bridge, Bombay –4





## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,
टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्त फरक झाला तर त्याची जवाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यत: कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जवाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.




'दीपावली'चा

# हा 'अजून' एक प्रयोग

साहित्यातील मिरासदारी, ठेकेदारी, वगैरे वगैरे गोष्टींबद्दल घोळ घालण्याची आपली परंपरा तशी जुनीच आहे. त्याच त्याच शब्दांच्या उलटचा सुलटचा कोलांटचा उडचा वेळोवेळी पहायला मिळतच असतात. कालमानानुसार पात्रं बदलत असतात; थाट बदलत असतो; ढंग बदलत असतो. पण हे एवढंच. कालचे बंडखोर आज प्रस्थापित होऊन ठेकेदारीत कृतकृत्य असतात. आणि आजचे बंडखोरहि आपली वाट रूळवायचा प्रयत्न करण्यात, कळत नकळत बहुधा पुन्हा चाकोरी निर्माण करत असतात. यातूनच काही विशिष्ट लेखकांची मिरासदारी झाली असल्याची ओरड ऐकू येते आणि फलाणी फलाणी मासिकं अथवा प्राध्यापक मंडळी कुणाचा ठेका घेऊन बसलेयत् त्याचं चर्वितचर्वण चालू होतं. अमूक एक ह्याच्या कंपूतला, तर त्याला यावर्षीच्या सरकारी रतीबात बक्षिस लागणारच होतं नि तो दुसरा तमक्याच्या कंपूतला म्हणूनच त्याला वारेमाप प्रसिद्धी मिळते, इत्यादि हलक्या आवाजातलं बोलणं, त्या त्या वर्तुळात घुमायला लागतं. ठार जुने, जुने, नवे आणि नव्यातलेहि नवे असे काहीसे चमत्कारीक वर्ग पडतात. आणि मग योग्य तसे लागेबांधेहि जुळतात. अट्टाहासाने टिकवले जातात.

या वादावादीत शिरायचा आमचा बिलकुल मानस नाही. गेल्या एकवीस वर्षांच्या 'दीपावली'च्या वाटचालीचा मागोवा घेतला तर असंच आढळून येईल की, नवे–जुने असले कृत्रिम नि हवाबंद वर्गभेद 'दीपावली'ने कधीहि मानले नाहीत. सनातन कडव्या अभिनिवेशाने नव्यावर प्रहार करण्यात 'दीपावली' कधीच सामील झाले नाही आणि 'जिहाद'च्या आरोळ्या ठोकणाऱ्या आधुनिक कळपातहि कधी सामील झाले नाही. निखळ साहित्य गुणांच्या कसोटीला जे उतरतं ते आपलं, हा निरोगी दृष्टीकोन 'दीपावली'ने अखंड कायम राखला. तो अखंडच रहाणार. त्यादृष्टीनं नव्या नव्या प्रयोगाना 'दीपावली'एवढा वाव इतरत्र क्वचित्च मिळाला असेल. पण हे करताना, नव्याच्या अट्टाहासानं तोल जाऊ न देण्याचं अवधानहि सांभाळावं लागतं. तोल सांभाळावा लागतो. त्यात मात्र कधीच कसूर झाली नाही.

'दीपावली'चा हा 'अजून' एक प्रयोग आमच्या वाचकांपुढे सादर करीत असताना या सर्व गोष्टींची आठवण अपरिहार्यपणे झाली. मोजक्या लेखकांच्या एका समुहाने असा संपूर्ण अंक आखल्याचे हे उदाहरण मराठी साहित्यात तरी पहिलेच असावे. ह्या मंडळीपैकी आमच्या काही मित्रांशी चर्चा करताना अशा खास अंकाची मूळ कल्पना सुचली. विचार जुळले. आणि मग भराभर चक्रं फिरायला लागली. हा हा म्हणता अंक तयार झाला.

'अजून' या नावानं स्वत:ला संबोधणाऱ्या या 'ग्रुपमध्ये' तशी मंडळी मोजकी आहेत. आठवड्यातून एकदा एकत्र जमायचं, दिलखुलास चर्चा, वाचन, गप्पा यातून परस्परजाण साधायची—भवकम करायची, एकमेकांचं साहित्य वाचायचं, ऐकायचं, निर्भीडपणानं त्याचं विश्लेषण करायचं हा या मंडळींचा क्रम! ही सर्व मंडळी वृत्तीनं, विचारानं तरुण आहेत, अजून आहेत. साहजिकच रूढ अर्थानं वयाचा प्रश्न या मंडळींपुरता शिल्लकच नाही. कविवर्य वा. रा. कांत, सिनिक्, ना. व्यं. देशपांडे, यशवंत कानिटकर, य. दि. फडके, भास्कर उत्तरवार, माधव सराफ, नाफडे असे हे या ग्रुपचे अष्टपैलू. कालमानानुसार पाहिलं तर ढोबळपणानं तीन टप्प्यात विभागले गेलेले. विचारविभिन्नता हे खास वैशिष्टच असलेले. स्वत:ची वाट स्वत:च रूळवायचा प्रयत्न करणारे. आणि तरीहि साहित्याच्या ओढीने एकत्र बांधले गेलेले. ('अजून मैफल रंगते आहे'—अधिक ओळख पुढल्या पानावर होईलच.)

अशा तऱ्हेने एका ग्रुपला हा अंक देण्यात नुसतेच वैशिष्टचपूर्ण प्रायोगिकतेचे समाधान नाही. ठेकेदारी वगैरे भाषेत साहित्यातील कोंडीची रड गाणाऱ्या अनेकाना हा प्रयोग त्या दृष्टीनं निदान "अभिनव वाटेल" असं आम्हाला खात्रीपूर्वक वाटतं. विभिन्नतेत एकात्मता साधून

[पृष्ठ ६ वर पहा]






# ‘अजून’ची मैफल रंगते आहे ...




‘अजून’ची मैफल सुरू होते.

एकाच पोताचे गोत सांगणारे, विखरून राहिलेले धागे हळूहळू गोळा होऊ लागतात. एकमेकांभोवती वेग घेत आपसूक गुंडाळू लागतात.

कोण आलं, कोण आलं नाही ह्याची चौकशी होते. मागल्या बैठकीत वाचून झालं त्याचा आढावा घेऊन होतो. ह्या बैठकीत काय वाचलं जाणार ह्याचा मागोवा घेतला जातो.

आणि पूर्वरंगाला तोंड फुटतं.

सूर लागतो. जवारदार तानपुरे षडज् पंचम भावांची वर्तुळे काढीत सूर घुमवायला लागतात. राग निश्चित होतो आणि दमदार फिरत घेऊन मुखडा फेकला जातो.

मैफल सुरू होते.

शब्द हळूहळू गोळा होतात. कुणाच्या तोंडी जायचं वाटयाला येतं ह्याची उत्सुकता पोटी धरून, अर्थाचं ओझं पाठीवर पेलीत एकामागून एक उडया घेऊ लागतात. पॅराट्रुपरच्या छत्र्या हळूहळू उलगडून फुगतात. प्रवास सुरू होतो–मूळ मुद्याच्या दिशेने.

रंग भरायला लागतो.

“दा. गो.” आपलं लहानसं पुडकं काढतात. लहानश्या कागदावर बराच अर्थ ठासून भरला असतो. ओकारासारखी दिसणारी पण ईकार असलेली वेलांटी अर्थ प्रसवू लागते. वाक्यांच्या ठाशीव आणि कातीव लडी एकामागून एक सरसरत येतात. ‘सिनिक्’ची ‘मृणाल’ मैफलवर छाया धरून रेंगाळून राहते.

मग “य. दि.” आपल्या साक्षेपी पद्धतीनं मैफलीस. कालिंदीच्या तीरावर घेऊन जातात. एका पदराने भूतकाळ आणि दुसऱ्या पदराने वर्तमानकाळ अशी वीण गोफ तयार करीत जाते. त्यांची दमदार निवेदन पद्धती कथेचे काळीज उकलून मांडते. पुस्तकांवरची परीक्षणे चर्चेसाठी पुढयात मांडली जातात आणि परीक्षणाचे परीक्षण अशी आगळी कथा सुरू होते.

“ना. व्यं.”चा चंद्र धुक्याच्या आडून डोकावतो. त्याचे किरण मनात घालमेल करणारी खेळणी मागे सोडून जातात. सौंदर्य आणि आशय झपूर्झाचे गीत गाऊ लागतात.

मधूनच कानिटकर गहरं बोलून जातात. न वाचता मैफल काबीज करणारी ही व्यक्ति अपवादाचा अर्थ सार्थ करते. त्यांची गोपातील सुभेदारीण बुरखा कधी काढणार? ‘आमच्या मासाहेब इतक्या सुंदर असत्या तर....’ ही खंत!

मग उत्तरवारांचा खुल्या हाताचे परण घेत शब्दांचा व सुरांचा ताल पेरणारा रियाझ सुरू होतो. निवडुंगाचं लाल फूल, लाल चेरी आणि लाल पुलोव्हर ह्यांचं यमक जुळून येतं; आणि सूर्य क्षितिजाच्या कूसावर क्षणभर खिळून पडतो.

सराफांचा ग्रामीण फणस मधूनच पळसाच्या पानावर आपले खडबडीत पोटात लपविलेले रसाळ गरे वाढू लागतो. वात्रटिकांची खमंग फोडणी बसते. च्यायला! कमी बोलणारा हा प्राणी बराच इरसाल हाय की!

असा रंग भरतो. अस्ताई आपली रससिद्धि करते आणि अंतऱ्याचे बोल सुरू करतात कांत!

मैफल धुंद झालेली असते. तानांची फिरत वाढलेली असते. दुहाई तिहाईच्या चक्रदार बोलाचे वेध घेत घेत मोहरेदार स्वरांच्या फिरती उपज घेऊन एकामागून



अनुक्रमणिका

सरसरत उलगडतात; धुंदीचे सुगंधी फवारे फेकीत.

आणि 'जेव्हा काळोखाला प्रकाशाचा बुडवुडा फुटला नव्हता' अशी सुरवात करून कांतांमधला तिशी पस्तीशीचा कवि अंधार आणि प्रकाश, कल्पना आणि अर्थ ह्याचा मेळ घालीत सौंदर्याला थिटं पाडणारं काव्य उधळीत जातो. वाहवा, वहोत अच्छेच्या पावत्या त्यांच्यापर्यंत पोचतात आणि परततात; त्यांच्या कवितेला लाजून.

मधूनच सिगारेटची फर्माईश होते. माशाल्ला! सिगरेटका कश नही तो मेहफीलमे दम कैसा! धूर सुटतो आणि स्वतःभोवती गिरक्या घेऊन मैफलीतच विरतो.

मग कथा, कव्य, शास्त्र, विनोद ह्याना चवदार करून सोडणारे ना. व्यं.-कडील 'मक्कळ बीजा', दा. गों. कडले एग्ज टोस्ट, य. दि. कडलं खमंग थालीपीठ, कानेटकरांची जिभेवर विरघळणारी शंकरपाळी, सराफांकडल्या भाजणीचा कुट् आवाज करीत मोडणाऱ्या चकल्या आणि उत्तरवारांकडील सँडविचेस. व्वाह!

मैफील कथा काव्यातून क्षणभर भानावर येते. रेंगाळती चव जिभेवर घोळवीत ओठ ओले करते; चहाचे घुटके घेत घेत. काय चव आलेली असते सोनेरी चहाला. पण साखरेची गोडी अगोड करून घेणारा मैफलीचा शायर मात्र अगोड चहा घेतो. गोडीसुद्धा अति परिचयानं अगोड झालेली. सॅकरीनच थेंब हा वहाणा!

मग झरारता अंतरा उत्तररंग सुरू करतो. 'असा मी' डोकावतो आणि मैफलीला हंसवून जातो, अत्रेंचा 'झालाच पाहिजे' कडाडून जातो, वेंद्रयांचा 'संवाद' अंतःर्मुख करून 'नमन' करायला लावतो. झाकोळ, माणूस, चक्र, रथचक्र डोकावून जातात. विजेची टाळी वाजते. अवलोकिता आपलं साक्षेपी दर्शन घडवते तर कधी 'वासूनाका' 'वास' घेऊन (आणि ठेवूनहि!) जातो. कुणीहि येतं, हजेरी लावून जातं. मैफलची धुंदी वाढवत, घेत निघून जातं.

मराठीतलं नव्यानं प्रसिद्ध झालेलं प्रत्येक लक्षवेधी प्रकाशन पान फडकावून जातं आणि मग काही वेदना उमटतात. वाळ कोल्हटकर आणि वसंत कानेटकर ह्याना मराठीत नाटककार म्हणून कायमचं स्थान मिळवून देणारी प्रदीर्घ चर्चात्मक लेखमाला लिहिली गेली पाहिजे; वरं का दा. गो.! साहित्याच्या मूल्यमापनाचे जुने निकष केव्हा वदलतील? अनुभवाच्या अभिव्यक्तीपुरतेच कलाकृतीचे क्षेत्र नसावे. It should be more than a camera snap! साहित्यक्षेत्रात दादागिरी नको. कलाकाराचे सर्जन भितीच्या छायेत व्हायला नको. फडके, तुम्ही ह्यांवद्दल परखड लिहा! संगीताची वौद्धिक वाजूपण मांडली जायला हवी, वरं का उत्तरवार!

उत्तररंग संपत येतो. घरी वाट पाहत असतील. जायलाच हवं. अगतिक संसारी पुरुष उठतात.

पण पुढील मैफल भरायची असते. अशीच रंगायची असते. एक आठवडा पुरतील एवढे साहित्यमय क्षण मागे ठेवून मैफल संपते. पुढील रविवारची वाट पहात......

अजून मैफली भरायच्या आहेत.

•••

[ पृष्ठ ४ वरून ]

आपलेपण कायम राखणाऱ्या आणि कुठल्याच चाकोरीत गिरगिरत न रहाण्याची, चौकटीत न बसण्याची जिद्द बाळगून पुढे जाणाऱ्या, वय, वृत्ति, विचार, शैली, अभिव्यक्ति या सर्वातील विभिन्नता कायम ठेवून सहकारी वृत्तीने, सांघिक भावनेने पुढल्या टप्प्यावर नजर खिळलेल्या ह्या मंडळीनी, प्रत्यक्ष वृत्तीनेच अनेक प्रश्नांची उत्तरे दिली आहेत. हेच ह्या 'अजून' खास अंकाचं प्रयोजन. आमचे चोखंदळ वाचकहि या प्रयोगाचं स्वागत करतील आणि अशा प्रयोगाचं चीज करतील, याबद्दल आमची खात्री आहे.

या अंकाच्या तयारीसाठी 'अजून'च्या सर्वच मंडळीनी अतोनात श्रम घेतले याचाहि येथे खास उल्लेख करणे आवश्यक वाटते. त्यांचे व 'दीपावली'चे संबंध लक्षात घेता शाब्दिक आभार मानणे त्यांना आवडणार नाही व हा कलात्मक मतभेद आम्हांला अमान्य करता येत नाही. त्याना त्यांच्या धडपडीत हार्दिक शुभेच्छा व्यक्त करतो.

—संपादक

अशी रंगते बैठक-!

एक प्रज्ञ कवि म्हणून परिचीत. मान्यता स्थिर झाली, पण परिचय स्थिर झाला नाही. कारण प्रतिभा थांबली नाही. प्रतिभेचे चैतन्य आणि सर्जन वाढते आहे. नवी क्षितिजे धुंडाळते आहे. दीपावलीच्या वाचकाना त्यांचा अजूनपणा त्यांच्या गेल्या वर्षीच्या उन्मेषशाली गद्यातून प्रत्ययास आला. 'अजून'चा ज्येष्ठ आणि श्रेष्ठ सूर.

विशेष प्रसिद्ध साहित्यः रुद्रवीणा, शततारका, वेलांटी, वाजली विजेची टाळी. वेलांटी संग्रहास महाराष्ट्र सरकारचे पारितोषिक.

वा. रा. कांत

१. एक आगळे नाट्यकाव्य
२. सौंदर्यस्वर्गाच्या सीमेवरील चारुता—
३. भाव जेव्हा लयबद्ध होतो—

# चुंबन



**निवेदक**

मीरत —

२३ एप्रिल १८५७ ची संध्याकाळ—

अगोदर, दुपारी, घोडदळाच्या तिसऱ्या पलटणीतल्या शिपायांनी नवीन काडतुसे वापरण्याचे नाकारले होते आणि या शिपायांना बंडखोर ठरवून, इंग्रज सेनापतीने त्यांना कोर्टमार्शल केले होते.

ह्या घटनेचा हिंदी शिपायांच्या मनावर परिणाम झाला होता. पण तो बाहेरून दिसत नव्हता; किंवा ते दाखवीत नव्हते. नेहमीसारखेच ते किंचित् असंतुष्ट, म्हणून बेमुर्वत आणि काहीसे बेफाम दिसत होते. चेहरे थोडेसे कठोर, ताठर बनलेले. एवढेच त्यांच्या मनावर पडलेल्या ताणाचे दृश्य चिन्ह.

संध्याकाळ झाली. रोजच्या प्रमाणे आपल्या तनामनाचा ताण सैल करण्यासाठी आणि मरणाच्या सावलीत मिळेल ती मौज साधण्यासाठी ते शहरातील वेश्यांच्या वसतीत शिरले. वेश्यांनी आपल्या घरांची दारे, त्यांना पाहताच, बंद केली. शिपायांना आत घ्यायला त्यांनी आज नकार दिला. शिपाई भडकले.

तेव्हा त्या म्हणाल्या, "कोर्टमार्शल होऊन कैदखान्यात पडलेल्या आपल्या भावांना आधी सोडवा आणि मग इकडे या. आपल्या भावांचा बदला घ्यायला भिणाऱ्या नामर्दांना आम्ही आमच्या देहाला स्पर्श करू देणार नाही. आमची चुंबने भ्याडांना मिळणार नाहीत."

आधीच त्रस्त झालेले, दुखावलेले ते बेदिल सैनिक या शब्दांनी भयंकर चिडले. हा अपमान त्यांना असह्य झाला. मनाच्या दुःखाला





अनुक्रमणिका

देहाचाही दिलासा मिळणार नाहीं. मनाची आग अधिकच वाढली. संतप्त झाले ते. जुलुमी इंग्रजांविषयी त्यांच्या मनात जी चीड होती, तिला आता त्वेषाची, विरोधाची धार आली. निरपराध देशबांधवांवर झालेल्या अन्यायाचा सूड घेण्याची ईर्षा त्या धारेत लकाकली. छावणीतली दुपारची घटना त्यांच्या मनात वेगळ्या स्वरूपात सजीव झाली. वेगळ्या, नवीन भावनेच्या कढत लाटा त्याच्या रक्तात उसळल्या. इंग्रजांना हाकलून हिंदुस्थान स्वतंत्र करण्याचा जो उठाव देशभर चालू आहे, तो त्यांच्या अंतःकरणाला येऊन भिडला एकदम; आणि ती दुपारची घटना म्हणजे त्या देशव्यापी स्फोटाचा उद्रेक आहे अशी खूणगाठ त्यांनी मनाशी बांधली. आवेशाने त्यांनी आपल्या दोस्तांना ललकारले—

"भाइयो चला, तावडतोब घोड्यावर स्वार व्हा. आणि जेलखान्यावर हल्ला बोला. आपल्या भावांना आधी सोडवू आणि मग—"

झाले, छावणीच्या रोखाने त्यांचे घोडे दौडत निघाले.

चुंबनामधून अशी एक ठिणगी उडाली आणि सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धाने रात्रीतून पेट घेतला. त्या संध्याकाळची ही गोष्ट.

## [ प्रवेश पहिला ]

(**स्थळ**— वन्नो वेश्येच घर. संध्याकाळची वेळ. दार लागलेलं आहे. दाराशी गुलबशीचा ताटवा फुलला आहे. त्याचे लाल पिवळे रंग संध्या रंगाशी स्पर्धा करीत आहेत. कुंवरसिंग प्रवेश करून दारावर थाप देत आहे.)

**कुंवर**— दार उघड बन्नो, प्यारी उघड दार
चंद्रकोर मनोऱ्यामागे हंसते आहे
गुलबशीच्या फुलांनी सांज फुलते आहे
बन्नो उघड दार.

**बन्नो**— (दाराआडून)
नाही कुंवर आज सांज पेटते आहे
बदमस्त शराबी डोळ्यांनी जळते आहे
भीतीनं दिव्यासारखे काळीज कापते आहे
नाही कुंवर नाही दार उघडणार नाही
कळ्यांची भीड मला पडणार नाही.

**कुंवर**—कळ्याचेच शब्द मी खुडून आणले आहेत
ओठी 'जामेजमशेद' भरून आणले आहेत
बन्नो उघड दार

**बन्नो**— 'जाम'मधी मला जाळ भडकताना दिसतात
बंदुकीच्या गोळ्या सणसणून उडतात
सारेच प्याले मग खळखळून फुटतात
उद्याचे जग मला त्यात दिसत नाही
नाही कुंवर नाही दार उघडणार नाही

**कुंवर**— आंगणात गुलबशीत पहा सांज सांडते
काल‌च्या तुझ्या चुंबनासारखीच मिटते
पहा पहा इथे कपाळावर गालावर
अजून त्याची सारखी फुले होत आहेत
पहा दार उघड

**बन्नो**—चुंबनाच्या गोष्टी ना ? जा आता विसरून.
दातांनी काडतुसे पहा जरा तोडून
ऐक कसा सणसणत शब्द येत आहे
सारे आंबेवन पेटून उठत आहे
जल्दी जा, छावणीत लपा कुठेतरी
नाही कुंवर नाही दार उघडणार नाही
कळ्यांची भीड मला पडणार नाही.

**कुंवर**— लपण्यासाठी नाही असे परदेशी आलो
प्राण आम्ही भाल्याला टांगूनच निघालो
मृत्यु—हातामधला मोतियाचा गजरा
धुंदीत त्या तुझ्याशी भिडवल्यात नजरा.

**बन्नो**— पुरे पुरे कुणाची नजर लागेल बाई
तरीच केलीत काडतुसे तोडण्याची घाई.
दुपारी कोर्टमार्शल झाले भाईबंद.
अंगरख्याचे आता का हो तोडता बंद.
नाही कुंवर आज दार उघडणार नाही
कळ्यांची भीड मला पडणार नाही.

**कुंवर**— आम्हालाही त्या भाईचा फार ख्याल आहे
आम्हालाही संकटांचा त्यांच्या जाळ आहे
तीच धग आम्हाला विसरायची आहे
इष्कात दीनदुनिया बुडवायची आहे
बन्नो उघड दार, उघड ना दार ?

**बन्नो**— पुरे पुरे कुंवरसिंग, इष्काची बात
हंसेल चौकाचौकांत ताऱ्यांची रात
लाल होतात शर्मेने रस्त्यातले कंदील
सरकार चला सावरून डोईचा मंदील.
पुरे खुशीच्या दारी टिचकी चांदण्याची !
हालत नाहीत हत्तींनी दारे नाराजीची.
नाही कुंवर नाही दार उघडणार नाही
कळ्यांची भीड मला पडणार नाही.

**कुंवर**— उघडल्या दाराला आम्ही टाकू तोडून.

**बन्नो**— हुकुम फिरंग्यांचा आधी या पण घेऊन.

**कुंवर**— पुरे झाली मस्करी आता जीवघेणी
माझाही राग अजून पाहिला नाही कोणी.

**बन्नो**—रागाचा निखारा तो आणखी फुलवा
शूर साथी घेऊन पुकारा ना 'बलवा'
बंडाचे निशाण छावणीमधे चढवा
तिसऱ्या पल्टणीचे बहादूर सोडवा
रणमर्दांनी त्या जेव्हा हुकुम मोडला
हातात तेव्हा बांगड्या तुम्ही का हो भरल्या ?

**कुंवर**—बंडाचाही वक्त येईल पण आज
रंगली आहे इष्काच्या विड्यासारखी सांज

**बन्नो**— विड्यांतून कोणाचे पहा रक्त गळते








## ऊन--तिशी पस्तीशीचे

वितळत्या चांदीची घगघगती पाणरेघ
लाटांना फुटणारी
क्षितिजाला कापणारी;
गाणारे ऊन साळुंकी पंखाचे
केवड्या दुपार रंगाचे
अभ्रात उडते
पाण्यात पडते आणिक चंद्र होते
तोच चंद्र कुणी उरात जपत बसते
तळपत्या खाडीच्या एकांत काठावर
काळा गॉगल लावून
घाम घाम होऊन
मासळचा वनून
झळकती आठवणी पाण्यात पायाशी
कुरळात कानाशी
एक रुपेरी केस वेदनेने पिकून
हालतो झिळमिळून
जेव्हा लकेरत येते गाणारे ऊन
साळुंकी पंखाचे
केवड्या दुपार रंगाचे
तिशी पस्तीशीचे
मध्यान्हीचे—
त्वचेच्या

—कान्त

तुम्हाला त्या रक्ताची मी आण घालते
परतून जा आधी, घ्या सूड त्या रक्ताचा
ठेवते मी करून विडा पंचप्राणाचा

**कुंवर**—वन् नकोस बन्नो हे चालणार नाही
विडा घेतल्याशिवाय आम्ही जाणार नाही.
इज्जतीने उघड दार, वेळ नको लावू.
दारासह इज्जतही उडवून देऊ. ?

**बन्नो**—कुंवर मला इज्जत कधी कुठे होती ?
मला अन्नापेक्षाही चिंधी महाग होती
एका चिंधीसाठी मी नग्नपणा विकला.
लाचार कुडीत भरला इष्काचा प्याला
आठवते मी पांघरून रात्र झोपले होते.
आज रेशमी साडीत नागवीच वाटते.
वळजोरीचा धाक इथे कोणाला घालता.
धरित्रीला पदर आहे माझ्यापुरता
देशद्रोह्यांना पण इथे थारा नाही
म्याडांना इथे चुंबन मिळणार नाही.
नाही कुंवर, नाही दार उघडणार नाही.
तल्वारीची भीड पण पडणार नाही.

### [ प्रवेश दुसरा ]

(स्थळ – तुरुंग – वेड्यांनी जखडलेला कुंवर गजाच्या दाराशी उभा आहे. बन्नो येते.)

**बन्नो**— कुंवर इकडे पहा
मी आले आहे
ल्याले आहे साडी तुझ्या आवडीची
पिवळ्या गुलवशीची
पहा ना जरा ? —



मी आले आहे.

**कुंवर**— कशाला आलीस बन्नो, आता जा
फार वेळ झाला
सुकली आहे सारी गुलवशी
रणरणती दुपार झालीय् सांजेची.

**बन्नो**— आले आहे ना मी ?
डोळ्यात सांज घेऊन,
फुलले आहे फुलांनी माझे अंग अंग
मी आले आहे चुंबन देण्यासाठी
तुझे राहिलेले.

**कुंवर**— मला त्याची बन्नो, गरज नाही आता
चुंबिले आहे मृत्यूने मस्तकी
उमटले आहे
होऊनिया चंद्र ते शेवटीचे
चुंबन शीतल गोड अमृताचे
बन्नो तूं जा आता सुखाने रहा.
विसरून जा अन् दाराशी तुझ्या
बोललेले बोल, दुष्ट कठोर–

**बन्नो**— त्याच बोलाची रे माळून फुले
आले आहे मी
राया, तुझे प्रेम नाही ओळखिले
घायाळ केले कठिण शब्दांनी
मला क्षमा कर
बोल पुन्हा बोल, बोल रागावुनी
तोडून का नाही टाकलेस दार ?
आता टाक तोडून
ही सारी बंधने, ही पृथ्वी आकाश
आंथरिन देह तुझ्या पायाखाली
क्षमा कर मला.

**कुंवर**—कसली क्षमा वेडे मागतेस
उतराई होऊ मीच कसा तुझा ?
तुझ्या शब्दे प्राण देहात जागला.
प्राणात सूर्य नवा उगवला.
त्यानेच दाविला हा धन्य दिवस
देशासाठी देह वाहण्याचा !
बन्नो जा इथून
तुलाही हरामी करतील ते कैद.

**बन्नो**— त्यांनीच मला इथे पाठविले
असा भिऊ नको, बावरू नकोस.
दिलदारा माझ्या.

**कुंवर**— त्यांनी पाठविले ? आलीस तू कां ?
का इथे आलीस ? दुष्टांच्या हातात
मृत्यूच्या दाढेत —

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका










# एकटी टेकडी एकाकी झाड

**क्षितिजाची पापणी**
**ढगांत मिटलेली**
**सूर्याची त्याची स्वप्नें**
**धुक्यात विझलेली**
**पिकलेले रोमांच**
**सावरून उभीशी**
**एकटीही टेकडी**
**ठेचाळून स्मृतीशी**
**एकाकीच झाड वर**
**सावली हरवलेले**
**ओसाड अवकाश**
**गगन गमावलेले**
**उभा एकटेपण**
**मी घेऊन झाडाचे**
**पायरव रानात**
**नुसते सांगा त्यांचे**

**–कान्त**

**बन्नो**— अरे कुंवर राजा, घावरतोस किती ?
म्हटले ना आले मी
चुंबन देण्यासाठी तुझे राहिलेले
ऋण जन्मोजन्मीचे.
**कुंवर** — थट्टा नको बन्नो, अवेळी निष्ठुर.
शब्द शब्द तुझा खरा केला आहे.
करोनी मुक्त तिसऱ्या पल्टणीला
फिरंग्याची शिरे वाहून देवीला
शहीदांच्या रक्तांचा घेतला मी सूड.
लवविले नाही उभारिले निशाण.
फडकत ठेवीन सूर्यलोकांतही
चढोनी फाशीच्या उद्या तक्तावर.
सुखी रहा फुला
फुलात फुलापरी
शेवटचा शब्द ऐक हा एवढा
निघून जा, या नरकांतून.
जा ना ? जा, जा म्हणतो ना ?
**बन्नो**— जाऊ मी कशी रे
जाऊ देणार नाहीत ते मला
त्यांनी – त्यांनी–मला ?
**कुंवर**— त्यानी– इथे–काय ?
**बन्नो**— होय त्यांनी – होय.
आणलीय् इथे मला कैद करून.
जाणार तरी आता मी कुठे रे ? –
घरच त्यांनी माझे जाळून टाकिले
इंदर्, चंदर् सल्मा गेल्या ः त्या.
तिथून पळून.
अरे तुला ते पकडायला आले
आग लावून गेले.
आंगणातली सारी गुलबशीची फुले
बघ ना मे यांनी तीही जाळून टाकली
फुलात का तिथे तूं दडून होतास ?
बिचारी फुले !
**कुंवर** — जळली ती फुले !
**बन्नो**— जळली नाही तर !
पण नाही कुवर, जळलीच नाहोत ती
लपवून ठेवली, मी त्या सांजेत
मावळतीकडे बघ, रोज फुलतात.
सांगून ठेवलंय मी–कुंवरला फार फार
आवडतात म्हणून.
**कुंवर**— बन्नो, बन्नो, थांब,
वेड लागलंय तुला ! काय वडवड करतेस
इंदर् चंदर् सल्मा गेल्या तेव्हां,
तूही पळून का नाही गेलीस.
सांग–सांग तू का गेली नाहीस पळून ?
**बन्नो**—रागावू नकोरे
सांगते, सांगते सारं काही सांगते
लावायची होती ना ? मला पुन्हा गुलबशी–
थांबले मी म्हणून.
**कुंवर**–इथे कशी आलीस ?
**बन्नो**–मी कसली येत होते
त्यांनीच आणलं माझ्या मुस्क्या बांधून.
गेले होते मी गावच्या वेशीवर
चपात्या घेऊन
ललकारून म्हटलं.
"दोन दोन घ्या आणि दहा दहा द्या
पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत
उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत
दाही दिशांना हा संदेश न्या
दोन दोन घ्या आणि दहा दहा द्या."
तेवढ्यात तिथे चार गोरे आले
आणि म्हणाले, "तू बागी आहेस"
मग मी म्हटलं "तुम्हीच बागी आहात
आमच्या देशात आम्ही कसे बागी ?"
**कुंवर**— शाबास बन्नो, शाबास शाबास.
म्हणूनच खाली वाकलं आकाश

असं धन्य होऊन.
**बन्नो**— हो ना कुंवर.
वाटलंच मला असंच तू म्हणशील.
नाहीं तरी आमचा वेश्याचा जन्म
कुणाला तरी देह दान द्यायचा
दिलवर, धनी तू या माझ्या देहाचा
बादशहा माझा या जोबनशाहीचा
तुही निघून गेलास
देशालाच दिले मी जन्माचे दान

**कुंवर**— तुझं हे दान देशाला पावलं.
गावोगावी नेलास संदेश स्वातंत्र्याचा
शब्द अन्नदेवाचा
हुकुम जगन्नाथाचा
पोचवलास घरोघर, शाबास बन्नो.
पण – पण बन्नो,
आता ते तुला ?, तुला ठार मारतील.
**बन्नो**— मारणारेच मरतील.
धीर धर कुंवर
मरणाच्या दारात आपण उभा आहेस
माझ्या मरणाच्या कल्पनेनं भितोस ?

**कुंवर**— पण बन्नो,
पाहवत नाही ग फुलांचं मरण
नसतांच फुलं अशी मरणासाठी
**बन्नो**— कसं मरावं हें फुलालाच कळतं.
अबोलपणं गळतं, मातीत मिसळतं
पुन्हा मातीमध्ये डोळे उघडतं.
अंधारांत तारांना वाकुल्या दावतं.
मीहि तुला वाकुल्या दाखवीत होते ना ?
अश्याच–अश्याच.

**कुंवर**— थांब, थांब बन्नो, बोलायची थांब
मलाही आता तू वेड लावशील
असं बोलून बोलून.
आधी मला सांग.
मरणाच्या गुहेत का शिरलीस तू ?
**बन्नो**— मी वरी मागे का म्हणून राहीन ?
तू गेल्यावर.
अन् खरंच कुंवर.
त्या रात्रीचा पराक्रम तुझा
मी पाहिला आहे
खोलीत माझ्या, अंधारात बसून
खूप डोळे भरून—
रागावून तुझ्यावर दार बंद केलं
अन् काळीज लकलकलं
भीतीनं जिवाचं पाणी पाणी झालं.
मी दार उघडलं
पण खरंच वेड्या तू गेला होतास
मोत्याचा चारा टाकून गेला होतास
खरंच का चोचीत दुखावला होतास
माझ्या राजहंसा ?
त्याच रात्री छापा छावणीवर घातलास.
त्या रावणाच्या बंदीवासातून
सोडवलेस देवांना तिसऱ्या पल्टणीच्या.
धडधडा छावणी जळत होती रात्रभर
रात्रभर सणसणून गोळ्या सुटत होत्या.
नक्षत्रांच्या लाह्या जशा फुटत होत्या
रात्रभर तुमचे अन् घोडे धावत होते
या माझ्या डोळ्यांत
आभाळापासून आभाळापर्यंत
या माझ्या डोळ्यांत
चंद्र उगवला मध्य रात्रीनंतर
तरीही तुमचे घोडे धावत होते
चंद्रबिंबावर
या माझ्या डोळ्यात हो–माझ्या डोळ्यात
**कुंवर**—होय रात्रभर घोडे धावत होते
सकाळीच परंतु त्यांना घेरले होते
जालीम गोऱ्यांच्या तोफखान्याने
तेव्हा डोंगरावर सूर्य आला होता.
तोफेचा गोळा तोही लाल लाल.
धगधगणारा.
परंतु आम्ही डगमगलो नाही
म्हटले द्या उडवून तोफेला बांधून.
आम्हा सर्वांना.







अनुक्रमणिका

गनिमापुढे ही मान लवणार नाही
तरवार ही आता म्यान होणार नाहीं
"खल्क खुदाका, मुल्क बादशहाका
और हुकुम रानी लक्ष्मीबाईका
नाना पेशवेका
हात त्यांना कलम करून दिले आहेत
जुळणार नाहीत ते
आता दुसऱ्यापुढे
**बन्नो**—मग त्यांनी घातल्या
बेड्या तुझ्या हातात
कोंडून घातलं गजाच्या दारांत
**कुंवर**—अन् म्हणतात आता.
फाशी देणार उद्या
सूर्य—उगवल्यावर.
**बन्नो**—कुंवर माझ्या राजा,
म्हणून तर आले
तुला देण्यासाठी-राहिलेले चुंबन
अखेरचेच ते.



**कुंवर**—पण बन्नो, पहा
मधे उभे आहेत लोखंडाचे गज.
**बन्नो**—माझ्या जन्मापासून
आभाळी भिडून
मधे उभे आहेत असेच हे गज
जन्माचे जातीचे, उच्चनीचतेचे
पापाचे पुण्याचे
मीच कमनशीबी,
तू आला होतास
ओठी गजल फुलवून
फुलांचे हात घेऊन
मीच उभे केले आपल्यात हे गज
खोट्याच शब्दाचे, नसलेल्या हाकांचे
दैवाने आता
रोविले आहेत
पृथ्वीपासून आभाळापर्यंत
गज पोलादाचे
जन्म-मरणाचे
नाही, नाही हे टाकीन तोडून
डोके आपटून.
**कुंवर**—बन्नो थांब, थांब
आवर हे दुःख, मी काय करू?
तूंच खचल्यावर आभाळासारखी?
माझ्या जिंदगीची प्रेमाची तुर्बत
वाहून जाईल या तुझ्या अश्रूत
तूंच हाती दिलेस बंडाचे निशाण
तूच मला केलेस पाईक स्वातंत्र्याचा
उद्या मी शहीद होणार देशासाठी
नको काढून घेऊस अशी माझी हिंमत
धीर दे मला.
**बन्नो**—तुला धीर दिला
संदेश दिला रोटयांच्या कमळाचा
खेड्यापाड्यांना डोंगरदऱ्यांना
जगन्नाथाचा रथ येत आहे
विजेच्या चाकांनी
प्राणाच्या हाकांनी
वेगाने धडधडत
रगडीत शत्रूचे हजार हजार देह.
दिल्लीत उद्या ते निशाण लागेल
हवाया सुटतील
दिवे उजळतील.
जगमग जगमग कळयाफुलातून
प्राणा प्राणांतून
पण माझे घर रितेच राहील
जखम ही माझी वाहातच राहील.

# अन्न स्वावलंबनाची मोहीम यशस्वी करा !



मोहिमेची चार प्रमुख अंगे:

# महाराष्ट्राने आव्हान स्वीकारले

* जास्त उत्पन्न देणाऱ्या संकर बी-बियाण्यांचा वापर
* अन्न पिकांखालील जमिनीस कालव्याच्या पाण्याचा मोफत पुरवठा व उसाच्या लागवडीखालील क्षेत्रात कपात
* गव्हाचे व भाताचे दुबार पीक
* शेतकऱ्यांना सबंध हंगामभर वाजवी किंमतीची हमी

प्रसिद्धी संचालक, महाराष्ट्र शासन, मुंबई

अनुक्रमणिका



ऑ ग स्ट स्मृ ति

**माझे राष्ट्र, माझे साम्राज्य, अशी आपलेपणाची भावना लोकात निर्माण होते, तेव्हा लोक जीव देण्यास तयार होतात. (टाळ्या) मेलास तर स्वर्ग, जगलास तर स्वराज्य (टाळ्या) असे जेव्हा सांगितले तेव्हाच क्षत्रिय वर्ग निर्माण झाला. अशी बुद्धी आमच्या लोकात ब्युरॉक्रसीने निर्माण केली नाही.**

—लखनौ येथे ११ जाने. १९१७ रोजी स्वराज्याच्या मागणीवर झालेल्या लोकमान्यांच्या प्रकट भाषणातून.

माझी गुलवशी राखच राहील.
माझं गमावलेलं
कोण मला देणार ?

**कुंवर**——म्हणजे तूं त्यांना शरण
जाणार आहेस
माझ्या प्राणासाठी
चुंवनासाठी जळलेल्या फुलाच्या
शरण गेली आहेस?

**बन्नो**—नाही नाही, शरण गेले नाही
जाणारही नाही.
माहीत आहे तुला?
काय म्हणाले मी? विचारलं त्यांनी
"राणीच्या विरुद्ध बंड का केलंस?"
"बंड म्हणजे काय?" विचारलं मी त्यांना—
त्यांनी मला मग कापड दाखवलं.
—"कुंवरला दिलेलं हेच निशाण ना ?
खरं सांग बन्नो."
—"त्यांत काय सांगायचं!
मीच ते दिलं."
—"का दिलंस त्याला"
—"मागितलं म्हणून
दिलं मी शिवून"
—"बंडाचं निशाण आहे ते बन्नो".
—"असेल काही तरी मला काय करायचंय
तो जे सांगतो त्याला जे आवडते
तेच मी करते
मलाही आवडते
कारण माझं त्याच्यावर खूपखूप प्रेम आहे
एवढं कसं कळत नाही
यालाच बंड म्हणायचं असेल तर
खुशाल म्हणा मेल्यांनो."
यावर गोरे सारे आधी हंसले
रागात मग ते लाहीलाही झाले.
राहुटीत त्यांनी मला बांधून टाकले.
तिथूनच आले त्यांचा डोळा चुकवून
तुला इथे भेटायला.
मी काय जाते शरण त्या गोऱ्यांना !
हा पहा आलाच एक गोरा मेला.

**सैनिक**—ओ बन्नो, अशी इकडे का आलीस
पळून जाण्यासाठी ?
कुंवरला भेटायला.
उद्या सकाळच्याला फाशी देऊ त्याला
खुशाल मिठ्या मार त्याच्या प्रेताला

**कुंवर**—फाशीची भीति कोणाला सांगतोस?
जन्मलोच आम्ही एक फाशी तोडून
आपल्या नाळेची.
आता भीति नाही दुसऱ्या या फाशीची.
देशासाठी देह पडतो आहे गळून
जातो आहे जळून
मूठभर माती कृतार्थ होत आहे
मायभूमीच्या मंगलासाठी
प्राणांची आरती








ओवाळली पहिली
मंगल पांड्याने.
त्याचेच आम्ही शूर साथीदार
**सैनिक**——बंद कर जवान.
प।जी वंडखोरा.
**कुंवर**—वंडखोर आहात तुम्हीच या देशात
गोऱ्या सैतानांनो,
अजिंक्य, अमर हा आमचा देश
दृढ उभा आहे चौपाईवरती तुलसीदासाच्या
अन् याचे शेले
फाटणार नाहीत जळणार नाहीत
विणले आहेत ते
कबीराच्या खड्या दोहयाच्या पदरांनी
येथेच घुमले शब्द नानकाचे प्रेमाचे शांतीचे
अभंग नाम्याचे
त्याच्या भेटी आले
आंधळा कोहीनूर रणजीतसिंहाचा
अंगार बनून पेटला येथे.
सिराजुद्दौलाचे कबंध फिरते
मागत दान वंचनेने छिन्न झाल्या मस्तकाचे
बोडक्या झाडांना फुटतात बोटे
हजार हजार तुम्ही तोडलेली
सूत वळणारी



### ग्रामिणीका

### आकडं !

तुज डोवाळं लागलं
तंदी म्या आनलं चिंचेच आकडं
पन, समदं गाव लोक माज हसलं
म्हनत्यात तुजं पाऊल पडल वाकडं !
पैल्याराती —
माझ्या मिशाचं आकडं
तुज्या गालाला लागलं
तंदी काडलं तुया वाकडं
म्हनलंस दूर—व्हावा थकडं !

मुठी वळतात पेलाया समशेरी
फिरंग्यानो, पहा
दम उरला नाही तुमच्या दमदम्यात
प्राणांची भीक मागा प्रभूपाशी
लंदनला थेट भिडते आहे पहा.
तेग हिंदुस्थानची
पेशव्यांची पुकार
राणीची ललकार
त्यांतच हुंदका बन्नोचा माझ्या
थोडा दबलेला———
**सैनिक**—— खामोश कुंवर.
बडबड पुरे कर, दया येते तुझी.
जिभेला शेंडा फुटलाय भीतीचा
अजब आहे देश तुमचा हा स्वप्नांचा
**कुंवर**—बन्नो जा आता
हंसत जा—
दु:खी होऊ नको.
भेटेन फुलात उद्या गुलबशीच्या !
**बन्नो**—कुवर या जन्मी
मीहि अतृप्त
तसेच राहिले—
**कुंवर**—घेतलेले चुंबन
जाळीत राहते फक्त दोन देह
परंतु बन्नो,
न घेतलेले एकादे चुंबन
कुठे फुल होते, कुठे सूर्यबिंब
डोंगर माथ्याशी
अश्रूच्या काठाशी !

●●●

अनुक्रमणिका

# ऊ र्व शी म्ह ण जे...........



[२]

**राजा रविवर्माच्या कुंचल्यातून समूर्त झालेली ऊर्वशी–पुरुरवाची चित्रकथा....रूपाच्या लिपीत अरूपाचं लेखन करणारी अनादी वर्णमाला....स्त्री पुरुषाच्या मीलनाचं एक अद्‌भुत गूढ रहस्य....आणि त्याला छेद देण्याचा एका प्रतिभावंताचा हा प्रयत्न.**

फार वर्षांपूर्वी पाहिलेलं ऊर्वशी–पुरुरव्याचं एक चित्र मला आठवतं. साऱ्या रंगरेषांसह उमटतं, मावळतं; अन् पाण्यात चंचल मासळी हालावी, आणि तेवढ्यातच तिच्यावर उन्हाचा कवडसा पडावा, तसं काही तरी मनात उजळतं, चमकून जातं, निसटूनही जातं त्या मासळीसारखं. तुम्ही कधी पाण्यात हातानं मासळी धरण्याचा प्रयत्न केलाय का? मनात देखील अशाच काही कल्पना येतात. त्या शब्दात गावत नाहीत. ऊर्वशी–पुरुरव्याचं चित्र, राजा रविवर्म्यांनी काढलेलं ते चित्र तसंच मनात उलगडतं–झुळझुळतं.

राजप्रासादाच्या चंद्रशालेवरून ऊर्वशी आकाशात झेप घेते आहे. व्याकुळ पुरुरवा तिला अडविण्यासाठी हात पुढे करून, तिचा पदर धरू पाहात आहे. पदर काही त्याच्या हातात सापडत नाही. ती वर आकाशांत उड्डाण करतेच आहे. ती थांबत नाही. पुरुरवा मात्र त्या चंद्रशालेच्या कठड्याशी अडला आहे. ती त्याला तिथेच थांबवण्याची खूण करते आहे. अगतिक झालेल्या राजाचा चेहरा विरहाच्या भीतीनं, वेदनेनं व्यथित झाला आहे, दीन झाला आहे; तर ऊर्वशीच्या मुखावर एक फिकं अनामिक स्मित तरळतं आहे. त्या स्मितात वेदनेची छटा आहे. पण त्यापेक्षाहि अधिक अटळ नियतीची खोल जाणीव आहे. त्या नियतीपुढं नम्र होणारी सहनशीलता आहे. त्यातच भोगलेल्या सुखाची तृप्ति आहे. आणि अपरिहार्य त्यागाला सामोरी जाणारी स्वागतशील वृत्ति आहे. जीवनातल्या अंतिम कसोटीचा क्षण ओळखून ती राजाला म्हणते:

> "पुरुरवः पुनरस्तं परेहि
> दुरापना वातइवाहमस्मि"

'पुरुरवा, आता तू परत जा. मी वाऱ्यासारखी अप्राप्य आहे. परंतु पुरुरव्याला ताटातुटीच्या या अंतिम क्षणाचं स्वरूपच ओळखू येत नाही, पटत नाही. या अटळ क्षणाचा आघातही तो सहन करू शकत नाही. दुःखानं तो मूढ होतो, कोलमडतो. ऊर्वशीचं सहवाससुख नष्ट झालं आहे, तिचं कोमल शरीर, अम्लान तारुण्य आपल्या आलिंगनबंधनांतून निसटून गेलं आहे, या जाणिवेनं तो मूढ होतो. ज्याच्या बाहुबला-पुढं इंद्राचं वज्रही लीन होत असे, तो हा पराक्रमी पुरुरवा आपली प्रेयसी आपल्याला सोडून जात आहे आणि आपण एकाकी झालो आहों, या कल्पनेनं हादरतो, पिचून जातो. उलट ऊर्वशी आपल्याशी म्हणते : मी दूर जात असले, तुझ्या अभिलाषेच्या पलीकडे, स्पर्शाच्या पैलपार दूर निघून जात असले, तरी तुझ्या प्रेमबंधना-तून मी मुक्त होत नाही, होऊ शकत नाही. या ताटातुटीमुळं



अनुक्रमणिका








मी तुझ्या अधिक निकट येत आहे, असंच ती आपल्या स्मितानं त्याला सुचवीत आहे. या बाबतीत पुरुषापेक्षा स्त्रियांनाच अधिक आत्मविश्वास असतो का?

राजा रविवर्म्याला हे सारं सुचवायचं आहे की नाही हे मला माहित नाही. पण त्या चित्रांतून अत्यंत उत्कटतेनं ते सारं प्रकट झालं आहे, असं मला वाटतं. नाहीतरी कलावंतापेक्षा कलेवरच अधिक विश्वास ठेवायचा असतो, नाही का? माझ्या मनातला अर्थ ते चित्र साकार करतं, की ऊर्वशी–पुरूरव्याच्या कथेचा जो अर्थ मला भावला आहे, त्यामुळं मला हे सारं दिसतं, हा प्रश्न मला सुटलेला नाही. त्या कथेत स्त्री पुरुषाच्या मीलनाचं एक अद्‌भुत गूढ रहस्य अंतर्हित आहे असंच मला वाटत आलं आहे. स्त्री पुरुषाच्या प्रेमाची एक न सुटणारी समस्या तीत व्यक्त रूप पावली आहे. शारीरिक मीलन व आंतरिक मीलन यांतलं अंतर मोजणारी आणि ते अंतर कापणारी मानवी मनाची धडपड त्यात पकडली गेली आहे. देहस्विता आणि मनस्विता यांना छेद देऊन जीवनाचं वर्गमूळ शोधणारं ते एक प्रेमाचं अतर्क्य गणित आहे. रूपाच्या लिपीत अरूपाचं लेखन करणारी ती एक अनादी वर्णमाला आहे.

ऊर्वशी ही नरनारायणाच्या मांडीपासून जन्मली असं एका कथेत म्हटलं आहे, तर कुठं समुद्रमंथनाच्या वेळी सागरातून ती वर आली, तरुणपण घेऊनच ती जन्माला आली, अशी तिची दुसरी जन्मकथा आहे. ते काही असलं तरी एवढं मात्र खरं की, मनुष्याच्या मांड्यातली आग आणि सागराची अगाधता घेऊन ही सौंदर्यसीमा ऊर्वशी अवतरली. तिला बाल्य माहिती नाही. झोपेतून जागं होऊन, आईच्या स्तनातल्या दुधासाठी तिनं कधी भुकेजून आकांत केला नाही, की मातेच्या भावड्या अंगाईगीतानं गुंगून ती कधी पाळण्यात झोपी गेली नाही. ती कधी भातुकली खेळली नाही, की नको असलेल्या अंतरपाटाचा आडोसा घेऊन हंसत हंसत बोहल्यावर चढली नाही. मध्यरात्रीच्या जळत्या दिव्याला साक्षी ठेवून तिनं कधी पतीची अधीरतेने प्रतीक्षा केली नाही, किंवा बेभानपणे प्रियकराच्या बाहूत शिरताना, लाजून घाईघाईनं तिनं कधी शयनमंदिरातला दीप विझवला नाही. अनंत यौवन घेऊन जग जिंकण्यासाठीच ती सागरलहरीवरून नाचत नाचत आली. तिच्या पदन्यासावर विश्वातले ग्रहगोल, प्रेमिकाच्या धडधडत्या काळजाप्रमाणे लकलकले. तिच्या आगमनाने कळ्यांना फुलण्यातलं नवल–पाकळ्या उघडण्याचं आनंदमय रहस्य उमगलं आणि पुरुषांच्या मनांत कामनांचे पुंकेसर जागे झाले.

ऊर्वशी या शब्दाचा अर्थच आहे उत्कट अभिलाषा, अनंत कामना; आणि पुरुरवा म्हणजे अनेक प्रकारचे नाद काढणारा पुरुष—स्त्रीच्या अभिलाषेला वश करण्यासाठी नाद करणारा नर. काही पक्षी आपल्या मादीला वश करण्यासाठी विविध मंजुळ शब्द करतात. हा नाद मानवाच्या पौरूषाचं, पराक्रमाचं प्रतिक. नादावणे, नादी लागणे किंवा नाद लावणे या शब्दप्रयोगांत स्त्री-पुरुषांच्या कामनांचा हाच नाद अभिप्रेत असेल, आपली भाषा जीवनसत्त्वे समर्थपणाने प्रकट करते असंच म्हणावं लागेल. ऊर्वशी ही पंचेन्द्रियांच्या कामनांचे प्रतिक असली, तर रूप, रस, गंध, शब्द आणि स्पर्श यांच्यापासून उत्पन्न होणाऱ्या आनंदानं फुलणाऱ्या–त्यांच्या उपभोगानं बहरणाऱ्या पराक्रमी पुरुषाचं प्रतिक म्हणजे हा पुरुरवा, असंच मानावं लागतं.

तशी ऊर्वशीची गोष्ट फार लहान आहे, सरळ आहे. इंद्राच्या दरबारांतली ही अप्सरा. गायचं–नाचायचं, देवांची करमणूक करायची, हे तिचं काम. एके दिवशी एक राक्षस तिचं हरण करतो. स्वर्गातून पृथ्वीकडे येणारा पुरुरवा ऊर्वशीचा आक्रोश ऐकून धावून येतो आणि तिला राक्षसापासून सोडवतो. ऊर्वशी त्याच्यावर मोहित होते. त्यानंतर एके दिवशी, स्वर्गात लक्ष्मी-स्वयंवर या नाटकाचा प्रयोग सादर केला जातो. अर्थात् या प्रयोगाला, इंद्राचा परममित्र म्हणून राजा पुरुरवा यालाही पाचारण करण्यात येतं. नाटकांत ऊर्वशी लक्ष्मीची भूमिका करीत असते. संवादाच्या ओघात नारायणाला संबोधून बोलतांना, चुकून ती पुरुरव्याचं नांव घेते. कधी कधी नाटकांतून जीवन असंच बोलतं. पुरुरवा तिच्या हृदयात खोल शिरला होता. सहजच त्याचं नांव तिच्या ओठावर आलं. पण इकडे नाटकाचा रसभंग झाला. दिग्दर्शक भरताचार्य तिच्यावर रागावले. त्यांनी तिला शाप दिला, "जा, नर्तिकाधमे, तू पृथ्वीवर जा; आणि ज्याच्या वेडानं तू हा रसभंगाचा घोर अपराध केलास त्या पुरुरव्याशीच रममाण हो."

इथं एक शंका अशी येते की त्या स्वर्गीय नाटक-मंडळीत प्रॉम्प्टर नसावा. प्रॉम्प्टर नसला म्हणजे नाटकावर आणि नटीवर किती भयंकर आपत्ति कोसळते, नट नटीचं जीवन बरबाद होण्याचा प्रसंग कसा येतो, त्याचं हे ज्वलंत उदाहरण. प्रॉम्प्टरचे स्थान नाटकांत किती महत्त्वाचं आहे हे यावरून कळून यावं. असो, हे विषयांतर झालं. तसा ऊर्वशीला मनांतून आनंदच झाला, पण ती घाबरली देखील. भरतमुनींची तिनं क्षमा मागितली. उःशापाची याचना केली. तेव्हा ही हद्दपारीची शिक्षा सौम्य करण्यात आली. 'पुरुरव्याला तुझ्याकडून पुत्रप्राप्ति झाल्यानंतर बारा वर्षांनी तुला स्वर्गात परत येता येईल." असा तिला उःशाप मिळाला.

खरं म्हणजे तो शाप तिला वरदानच असतो. पुरूरव्याच्या सहवासात, आणि उत्कट, व इंद्रियसुभग प्रेमलीलांत, ही पृथ्वी तिला स्वर्गापेक्षाही सुंदर व हवीहवीशी वाटते. अमरलोकाचा तिला विसर पडतो. शापकाल संपतो तेव्हा एका नव्या दुःखाची तिला जाणीव होते. प्रियकराला सोडायचं, त्याच्या अमृतमधुर प्रेमाचा त्याग करायचा, आपला पुत्र, प्रत्यक्ष काळजाचा तुकडा, त्यास पृथ्वीवर टाकायचं आणि परत स्वर्गात जायचं, एकाकी बनून, भग्नहृदय होऊन. तिच्या काळजाचं पाणी









## द्रुत

किती जलद लयीत गातोस थांब ना जरा
माझ्या गीतकारा
जाणतो मी इथे आता वसंत नाही रानात
विलंबित हेमंताचे फिक्या म्हाताऱ्या उन्हात
पानझडीचा सूर—होय, पिकू दे ना पुरा
माझ्या गीतकारा
निश्वासच राहिले त्याचे शब्द झाले नाहीत
मात्रा दिवस–रात्रीच्या मोजता आल्या नाहीत
स्वरात फुलला नाही डसल्या अर्थाचा तुरा
माझ्या गीतकारा
सुख भोगण्यापूर्वीच सुरात त्याच्या विझलो
दुःख सोसण्याआधीच जळून कापूर झालो
नियतीच्या लयीत प्राण घुसमटतो घावरा
माझ्या गीतकारा

—कान्त

पाणी होतं. ह्या यातना तिला भयंकर वाटतात. परंतु आपली अगतिकताहि ती ओळखते. देवांच्या मनोरंजनासाठी, त्यांच्या कलात्मक आनंदासाठी आपला हा सुंदर देह, हे तारुण्य, आपलं नारीपण–सर्वांचा आपल्याला वळी द्यायचा आहे. आपल्या डोळ्यावरील अश्रूवर आपली सत्ता नाही. कारण ते पुसूनै लगेच आपल्याला रंगमंचावर हसायचं आहे, शृंगार करायचा आहे. आणि आपल्या वक्षातील दुधावर तरी कुठे आपला अधिकार आहे? अमृत पिऊन धुंद झालेल्या देवांपुढे आपल्याला नाचता यावं म्हणून, ते दूध जागच्या जागी असंच आटवायला पाहिजे. परंतु शुष्क होणाऱ्या या हृदयात एक प्रेमाची आठवण पण आपण घेऊन जात आहोत. ती आपल्याला जन्मभर पुरणार आहे. त्या स्मृतीत आपल्या साऱ्या वेदना विरघळणार आहेत, आपल्या वक्षावर ठिवकलेले पुरुरव्याचे अश्रु, त्याचे तृप्त, दीर्घ निश्वास, क्षितिजाची वंधने तोडणारी ती दृढ आलिंगने; डोळ्यावर, गालावर होणारी चुंवनाची ती फुले, आणि सर्वांगांतून प्राणांना लाभलेला आनंदमय आधार–हा आपल्याला जगाच्या अंतापर्यंत पुरणार आहे, हा विश्वास घेऊनच ती स्वर्गात येते.

पुरुरवा मात्र पृथ्वीवर विरहाने तळमळतो. असहायपणा, भयाण एकाकीपणा त्याला जाळीत राहतो. सुख, सौंदर्य, प्रेम काहीच पदरात पडलं नाही. आपण मात्र आंतरवाह्य पोखरून गेलो आहो. प्रेमाशिवाय जीवन अर्थशून्य झालं आहे, अशी खंत करीत पुरुरवा झुरत राहतो.

म्हणजे स्त्री पुरुषांच्या विरहाची, प्रेमभंगाचीच ही एक अनादी कथा आहे.

पण मला वाटतं, प्रेमभंगापलीकडलं काही अधिक या कथेत आहे. पुरुरवा हा मर्त्य–मानव, शारीरिक आकर्षणाकडे, पार्थिव सुखाकडे पाशवी सहज प्रेरणाप्रमाणे तो वळतो. ऊर्वशी अप्राप्य आहे असं दिसताच दुःखी होतो, हे खरं. पण ऊर्वशीवद्दलची त्याची ओढ केवळ वासनेची नाही. देवत्वाचीही त्याला ओढ आहे. अक्षय आनंदासाठी, तृप्तीसाठी तो तहानलेला आहे. हे देवत्व त्याला ऊर्वशीत आढळतं. तिच्यातल्या देवत्त्वाचं त्याला आकर्षण वाटतं. कारण ऊर्वशी देवलोकातली आहे. याच्या उलट ऊर्वशीला पृथ्वीचं आकर्षण आहे. स्वर्गातल्या अमरतेला ती कंटाळली आहे. दुःखहीन, वेदनाहीन सुखाचा तिला वीट आला आहे. तिची अमृताची चवच गेली आहे; आणि पृथ्वीवरील पार्थिव, क्षणभंगुर दुःखात आणि क्षणोक्षणी नवनवीन रूपं धारण करणाऱ्या सुखांचा अनुभव घेण्यासाठी ती या भूतलावर आली आहे. वासनेनं व्यथित होणाऱ्या मानवाला क्षणाचं सुख देण्यासाठी, त्याच्या आनंदात, त्याच्या वेदनेत सहभागी होण्यासाठी ती या मृत्युलोकावर उतरली आहे. ती स्वतः वेदनारहित असल्यामुळं तिला पृथ्वीवरली ही वेदना हवी आहे. स्वर्गात गेल्यावर, पुरुरव्याच्या विरहाची वेदना, ती फुलासारखी जपणार आहे.

पुरुरवा हा मनुष्य आहे. देवत्त्वाची ओढ असली तरी त्याला स्वर्गात जाता येत नाही. वेदनारहित आनंद त्याला हवा आहे, पण तो त्याला मिळत नाही. पाशवी सहज प्रेरणात, वासनेत, कामपूर्तीच्या क्षणात, ऊर्वशीच्या कुशीत त्याला ह्या आनंदाची किंचित ओळख झालेली असते. क्षणभरच त्या आनंदाचा अनुभव त्याला आलेला असतो. म्हणून तो ह्या वासनेतच गुरफटतो. परंतु हे गुरफटणंही कायमचं नव्हे. त्याचाही शेवट येतो. मग पुन्हा अतृप्ति, पुन्हा दुःख. दिव्य प्रेमाचं समाधान मिळत नाही. वासनेचा, अभिलाषेचाही तळ सापडत नाही. इंद्रिय सुखाच्या वाटेने दिव्य शाश्वत सुख मिळवण्यासाठी धडपडणारा माणूस शेवटी पशूच राहतो काय?

पशु आणि मानव. प्राथमिक अवस्थेत दोघांच्याही मूलभूत सहजप्रेरणा वासनेच्या एकाच समान पातळीवर वावरतात. या सहजप्रेरणांतूनच मानवी जीवनाला गति मिळते. सौंदर्य, कला, प्रेम यांचा जन्म या पाशवी सहज प्रेरणांतूनच होतो. परंतु पशुप्रमाणेच मनुष्यदेहात वसतं असलेल्या प्राणांच्या पलीकडे राहणाऱ्या आत्म्याचा स्पर्श जेव्हा या प्रवृत्तींना होतो. तेव्हाच त्यांना अर्थ येतो–आकार येतो. या आत्मिक, आंतरिक स्पर्शांत, सौंदर्याच्या, कलेच्या, प्रेमाच्या, धर्माच्या–इतकेच नव्हे तर मनुष्यतेच्या धारणेचे बळ असते. परंतु प्राणीसहज प्रवृत्तींच्या पातळीवर जोवर ही आत्मिक, आंतरिक शक्ति उतरत नाही, रूप–रस गंधाच्या मोहमय जगात येऊन जीवनांतल्या वेदनांशी आणि दुःखाशी एकरूप होत नाही, त्यांच्याबरोबर समरसतेनं राहायला शिकत नाही, तोपर्यंत त्या आत्म्याला आणि त्याच्या दिव्यत्त्वालाही काही अर्थ प्राप्त होत नाही.






पशूंची वासना ऋतु कालांनी मर्यादित असते. मानवी वासना मुक्त, असीम असते. प्रजोत्पत्तीसाठीच पशूला कामप्रेरणेचं आवाहन असतं. पशूंचा काम आवश्यकता आणि उपयोग यांनी सीमित झालेला असतो, तर मानवी काम हा निरुद्देश व निःसीम असतो. म्हणूनच तो काम आनंदाचं कारण झाला आहे; अक्षय आनंदाचा स्रोत बनला आहे. या भावनेच्या स्पर्शानं माणसाला मृदु, सुंदर, कल्पक आणि सर्जनशील बनवलं आहे. कलेची सौंदर्याची नित्य नवीं स्फुरणें आणि कल्पनेची नवनवीन क्षितिजें या मानवी कामप्रेरणेंतून उमलतांना दिसतात. कविता, कला, धर्म देखील याच प्रेरणेचं फल—फूल आहे.

"यथा पुष्पफलं काष्ठात् कामः धर्मार्थयोः वरः" असं महाभारत-कारांनी म्हटले आहे ते उगीच नव्हे. निरुद्देश आनंदाचे झरे या कामप्रेरणेतून मानवी जीवनात फुटले आहेत. परंतु हे झरे अक्षय व निर्मळ राखण्यासाठी, या कामाची परिणती प्रेमात झाली पाहिजे. रसांचा पार्थिव आधार घेऊन गूढ रहस्याच्या आकाशात संचार करणारं रूप, कामप्रेरणेला प्राप्त झालं पाहिजे.

प्रेमाचा जन्म देहात होतो. पण ते तिथंच स्थिर होऊ शकत नाही. स्त्री पुरुषाच्या आलिंगनात परस्परांच्या सुखांची मिळणी होऊ शकत नाही, पूर्तता होऊ शकत नाही. या शरीर मीलनात एक नवी तृषा निर्माण होते. या तृषेचं समाधान शारीरिक पातळीवर होणे असंभव. स्त्री-देहाच्या आत एक स्त्री असते. ती स्त्री अगोचर असते. इंद्रियातीत असते. शारीरिक वासनांच्या लाटांवर वाहात वाहात, माणूस जेव्हा मानससागराच्या पैल-तिरी जातो तेव्हा त्याला स्त्रीचं खरं प्रेम मिळतं. वासनेवर-देहाच्या देठावर फुललेलं हे प्रेम निरुद्देश असतं. सुंदर असतं. वेलीवर फुलणाऱ्या फुलाप्रमाणं.

पुरुषाच्या आतला पुरुषही देहात सापडू शकत नाही. शारीर संवेदनेच्या पलीकडे जेव्हा स्त्री पाहते, तेव्हाच तिचा पुरुष, तिचा प्रेमिक तिला सापडतो. एकमेकांच्या आलिंगनात बद्ध झालेली स्त्री पुरुषाची जोडी जेव्हा परस्परांचे देह भेदून, उल्लंघून एका वेगळ्या तरल विश्वात जाते तेव्हा तिला प्रेमाचा लाभ होतो. इंद्रियांच्या मार्गाने अतींद्रिय भूमीत प्रवेश करण्याचं नाव मानवी प्रेम. इंद्रियसुभग जगातून, अतींद्रिय आंतरिक जगात जाण्यासाठी तळमळणाऱ्या भावनेचे रूप म्हणजेच ही ऊर्वशी—पुरूरव्याची कथा. प्रेमासाठी फार मोठा त्याग, फार मोठं दुःख सहन करावं लागतं. व्यक्तिपरत्वे या दुःखाचं व त्यागाचं स्वरूप बदलेल, पण त्याचा स्वीकार केल्याशिवाय प्रेम हाती लागत नाही. पाशवी आकर्षण माणसाला खाली ओढीत असतं, तर त्याच्यातलं ध्येय-वादी, दैवी आकर्षण त्याला वर खेचीत असतं. या ओढाताणीत माणूस पशूपासून मोकळा, वेगळा होऊं लागतो. आणि असं वेगळे होतांना सलणारी, जीवाला व्यथित करणारी वेदना म्हणजेच मानवता—अन् तीच ऊर्वशी.

ऊर्वशी आकाशांत वर जात आहे, पोटी असीम दुःख घेऊन. पुरुरवा चंद्रशाळेच्या कटगराशी पृथ्वीला खिळला आहे वासनाचं, यातनांचं, गाठोडं बांधून. मध्ये असीम, अज्ञात आकाश पसरलं आहे : दोघांना दुरावणारं, वेगळे करणारं आणि एकरूप करणारं पण.

● ● ●










नांव–टोपण नांवामुळे विवाद्य ठरलेला लेखक. सिनिक्‌यांचे वैशिष्ट्य म्हणजे उगाच शब्दांची पखरण आणि प्रसंगाची भावना-विवश ओढाताण टाळणे. लिहिलेले साहित्य कांहींना मान्य, बऱ्याच जणांना भिन्न आणि कांहीं थोडयांना अमान्य. अजून लिहितो आहे आणि वाचक आपण लिहि-लेले समजावून घेत नाही म्हणून ओरडतो आहे. निर्भेळ साहित्य-विलासाकरता निर्भेळ मनांचे आदान-प्रदान असावे म्हणून 'अजून' जमवत आहे. जमणारे निःशंक असतील काय?–म्हणून तर सिनिक्. प्रसिद्ध साहित्यः–सिनिक्च्या कथा, सिनिक्'था, 'संवाद' (संपादित)

पा. गो. देशपांडे
सिनिक्

१. सिनिक्'था
२ रजत सृष्टीतील हास्यरसाचे कारंजे
३. सुरसुखखनी

# गि ला वा



आजचे युग
एक योग
एक भोग
एक भाग
एक ठग
एक जाग
एक जग
—असेच एक शहर

—एक रस्ता
आदी आणि अंत असलेला—
कुठे नागमोडी वळणाचा, कुठे सरळ, काही ठिकाणी आखूड, काही ठिकाणी विस्तारलेला, गल्ली–बोळे म्हणता येईल, "तट्टी मट्टी"चाही म्हणता येईल,—

कुठे ना कुठे कशाला तरी कसा तरी जोडणारा, मिळणारा, जुळणारा, भेदणारा, फारकतणारा,—

तरी अर्थहीन, शिस्तहीन, शैलीहीन,–
पण योजनेचा, आंखणीचा, लोकशाहीचा, स्वातंत्र्याचा, व्यक्तिमत्व नसलेला आणि आणखीन काही — . . . . . .

पण सगळीकडे रहाण्याकरिता, वसण्या-करिता, उठण्याकरिता, उठविण्याकरिता, प्रस्थानाकरिता, प्रयाणाकरिता, भक्षणा-करिता, शोषणाकरिता, रक्षणाकरिता, स्व-संरक्षणाकरिता, व्यवहाराकरिता,





अनुक्रमणिका

आणि चलनाकरिता रांगाच रांगा– सुरू होणाऱ्या, आटोपणाऱ्या, आकसणाऱ्या, जणूं क्षितिजापर्यंत भिडणाऱ्या,–अंत पहाणाऱ्या, पण अंताचा कानोसा मुळीच न देणाऱ्या —

एक दिवस, — तोही प्रकाश उधळत आलेला आणि हसऱ्या जीवनाचा—

नेहमीप्रमाणे अस्तास चाललेला, अंधाराला कबुली दिलेला आणि अंधारातही रांगा शाबूत ठेवणारा आणि अंधारातही उठून दिसणाऱ्या रांगा, —

एका रांगेत — . . . .

सर्व उभे, — माणसे म्हणतात, म्हणवून घेतात, सगळेच समजतात, समजावून सांगावयास मागेपुढे पहात नाहीत. सर्वानाच समजते आणि उमजत काहीच नाही. तसे होत नाही म्हणून ना खेद ना खंत. "च्यायला वेळ कुणाला आहे एवढे सगळे विचारात घ्यायला किंवा विचाराच्या बाहेर घालवायला. . . ."

काही नतमस्तक, काही घाम पुसणारी, कांहीं वायकांना पहाणारी, काही पुरुषांना निरखणारी, कांहीं कशी अगदीं कोऱ्या करकरीत पाटीसारखी. पण अशी पाटी की, काही लिहावयास गेले तर एक अक्षरही उमटणार नाही. . . . कुणाला घर आहे, कुणाला असून नसल्यासारखे आहे, कुणाला नसून असल्यासारखे आहे, कुणाला पांच गेले, पन्नास राहिले तर कुणाला पन्नास गेले पांच उरल्यासारखे आहेत आणि आणि काहींना, 'भांचोद, साला कित्येक आले आणि कित्येक गेले, किस्मत पाहीजे म्हणजे हृदयाची, कंबरेची आणि पायाचीहि सोय होते. . . . '

—दोघे बोलत होते, म्हणजे एक बोलत होता आणि दुसरा ऐकत होता. परंतु बोलणाऱ्याच्या तोंडावर मौनाची अवकळा होती आणि ऐकणाऱ्याच्या चेहऱ्यावर बोलण्याचा उत्साह होता.

बोलण्यात सर्व होते— विचार, तत्वज्ञान, राजकारण, समाजकारण, अर्थकारण, परहीत, जनहीत, स्वहीत(–उणे), इहलोक, परलोक, काम, राम, घाम, साम, दंड, गंड,— एवढं असून काही नव्हते ह्यावर ते बोलणे होते. बोलणारा बुद्धीवादाच्या अविर्भावाने तणतणत होता— ऐकणारा लोकशाहीच्या श्रद्धेने ऐकत होता. बोलण्यात आव होता आणि ऐकण्यात आव होता.

कुठेतरी विचार पांगुळले, विकार चेकाळले, शब्द लडवडले आणि अज्ञातांतून त्यांना कुबड्या मिळाल्या —

"लोकशाही धोक्यात आहे."

"माणूस जिथे होता तिथेच आहे. अरे, कसल्या सुधारण्याच्या गोष्टी बोलतां ?

सुसंस्कृताच्या वल्गना करता–
जरा ह्या माणसाला खरवडून पहा–
आत चक्क पशु दिसेल पशु–

चालणार नाही, फार दिवस असं भागणार नाही. कुणी ऐकणार नाही—
माणूस आतां गप बसणार नाही —
आफ्रिका खंडातील–
मागासलेल्या भागांतील —
अंधकारांतील—

सगळी माणसं खवळून उठली आहेत–चाकोरीचे जीवन सोडून जरा अवती भोंवती आणि वर खाली पहा–"

—चाकोरीबरोबर भाकरी आली. त्या भाकरीला शिव्या आल्या. त्या शिव्यातून वैफल्याची पंखहीन पिले संभवली, तडफडली– ह्या पिलांच्या शरिरांना मिटलेले डोळे होते आणि ते काही केल्या उघडत नव्हते—

—इतक्यांत बस आली. मरगळीला चेतना मिळाली, चकव्याला गति आली. काया हलली,— जणूं एकाच कायेला अनंत डोकीं आणि अनंत पाय होते. हात मात्र दोनच आणि डोळे पण दोनच.— ऐकणारा बोलणाऱ्याला म्हणाला "जा, तुम्ही पहील्यांदा जा, एकच जागा आहे." बोलणारा ऐकणाऱ्याला म्हणाला, "नाही तुम्ही जा, तुमचे रहाते घर दूर आहे. शिवाय तुमची वायको वाट पहात असेल. तुमचं सगळं नवं आहे—"

"छे हो, आतां कसलं नवं. झाली कीं, तीन वर्षं. तुम्हीच जा. तुमची मुलं घरी तुमची वाट पहात असतील."

"अरे खालीपिली क्या बात करता है, लोगोंकी खोटी होता है।"

कंडक्टरने तिसऱ्याच माणसास बसमध्ये घेतले, आणि बस् पहाता पहाता पसार झाली. . . . ●●●










अनुक्रमणिका

[२]

चॅर्ली चॅप्लीन ! नुसतं नाव कानी पडलं तरी कारुण्यानं थबथबलेली नि चेहेऱ्यावरल्या निरागस भावांनी हुरहूर लावणारी ती मूर्ति डोळ्यासमोर येते. ओठांच्या पाकळ्या आस्तेच उमलतात. नकळत स्वतः मुळीहि न हसता साऱ्या जगाला हसवणाऱ्या या अद्वितीय कलावंताच्या नाट्यपूर्ण जीवनाचा एक आलेख—



# चार्लस् स्पेन्सर चॅप्लीन

मी त्यावेळेस बारा वर्षाचा असेन. आमच्या हैद्राबादी सुलतान बाजाराच्या कोपऱ्यावर संध्याकाळी एक माणूस "यह, चार्ली चॅप्लीन एक आना, यह, चार्ली चॅप्लीन दो आना—" असा घोगरा-चिरका मिश्रित आवाज काढून मिशा विकत असे. काळी तुमान, जरा जाड बूट, उंच हॅट आणि पाहताक्षणी ओठांची मिठी तुटावी अशी ती मिशा विकणारी व्यक्ति माझे आकर्षण बनली. तीस वर्षापूर्वीची ही घटना आहे. त्यावेळेस मला चार्ली चॅप्लीन ही काय 'चीज' आहे हे माहित नव्हते. एके दिवशी कुणी पाहत नाही अशी खात्री करून घेऊन मी ती मिशी ओठावर चिकटवून आरशापुढे उभा राहिलो. स्वतःचा तो 'अवतार' निरखला आणि असा काही जोरात हसलो की, कुणी पाहत नाही ही घेतलेली काळजी व्यर्थ ठरली. मीहि हसत होतो आणि सगळे हसत होते. पाहता पाहता मी खजील झालो. माझे हास्य विरले आणि त्या बालवयातहि मी स्वतःला प्रश्न केला, 'सर्वांना हसवणाऱ्या मिशा पुरवणारी ही चार्ली चॅप्लीन वल्ली कोण असेल ?'

[२]

चॅप्लीन बारा वर्षाचा होता तेव्हाची गोष्ट. चॅप्लीनची आई गायनावर आपली उपजीविका चालवे. आपल्या मुलाना तळहाता-वरच्या फोडासारखा ती जपायची. दुःख, कष्ट आणि वेदना आपल्या मुलांपर्यंत पोहोचू नये याची दक्षता घेई. एके दिवशी चॅप्लीन आपल्या राहत्या घरी नेहमीप्रमाणे (संध्याकाळी) परतला तेव्हा त्याला आईची नेहमीची आपुलकीची दृष्टी आढळली नाही. काहीतरी

अनुक्रमणिका

विनसले आहे हे चटकन् चॅप्लीनच्या लक्षात आले आणि त्याला धक्का बसला. आई त्यावेळेस अधिक कृश, क्लांत आणि व्यथित दिसली. जी आई आपल्याकरता सारे सारे करते तिच्या चिंतेच्या काळात आपण तिच्या निकट असावे, तिला सोडून जाऊ नये, तिला दिलासा द्यावा अशी चॅप्लीनची भावना उत्कट झाली. काही करावं आणि जगाच्या किचकटपणापासून तिला वाचवावे असा विचार त्याच्या उत्कटतेला साथ देऊ लागला. आई त्याच्याकडे अनुकंपेनं पाहत म्हणाली, 'तू मॅकर्थीच्याकडे कां जात नाहीस ?' चॅप्लीनच्या मनात काय होते आणि आई काय म्हणत होती? चॅप्लीनला रडू कोसळले — खिडकीबाहेर एक भकास दृष्टीक्षेप टाकत आई त्याला पुन्हा म्हणाली, 'तू मॅकर्थीच्याकडे रात्रीचे जेवण घे. येथे तुझ्याकरिता काही नाही.' चॅप्लीनला आईच्या बोलण्यातली असहाय्यता स्पर्शून गेली. पण तो फक्त एवढेच म्हणाला, 'तुझी इच्छा असेल तर जातो मी–' आई क्षीण स्मित करत आणि चॅप्लीनचे डोके कुरवाळत म्हणाली, 'तर तू लवकर जा कसा.' आणि जरी चॅप्लीनने घरी राहण्याबद्दल बराच युक्तिवाद तिच्याशी केला तरी तिने त्याला काही घरी राहू दिला नाही. उपाशी बसू दिले नाही. चॅप्लीन अगदी अपराधी भावनेने, विमनस्कतेच्या गर्तेत गुरफटलेल्या आईला सोडून रात्रीचे जेवण घ्यावयास दुसऱ्याच्या घरी गेला. त्यावेळेस त्याला कल्पनाहि आली नाही की, पुढील विपत्कालाची ती केवळ सांगता होती. . . .

आज सत्त्याहत्तराव्या वर्षी चॅप्लीनचे वैभव आणि संपत्ति इतकी आहे की, पुढील दहाबारा पिढ्या तरी विनायास सुखात व ऐश्वर्यात विसावू शकतील. वयाच्या बाराव्या वर्षी 'एक उणे एक' टोकाला असलेला लंवक सत्त्याहत्तराव्या वर्षी 'एक अधिक अनेका'च्या टोकाला आलेला आहे.

[३]

चॅप्लीन लय-विलयात वाढला. आई गाणे म्हणे आणि सर्व संसार जगे. आईच्या जगण्यात मुलाना जगवण्याचे अवधान इतके अविरत टकटकत असे की, विश्रांति काय ती तिला पारखी झाली होती. परिणामतः प्रकृतीकडे दुर्लक्ष आणि आवाजात बिघाड झाला. गाडे तसेच रेटले जात होते. परन्तु एके दिवशी गाण्याचा बेसूर इतका झाली की, श्रोत्यानी थिएटर डोक्यावर घेतले आणि त्या क्षणापासून उपजीविकेच्या समस्येचा वासलेला 'आ' विक्राळ झाला. चॅप्लीन हे सारं पाहत होता. पाहत असतानाच वाढणाऱ्या वयापुढे जाण चालली होती. ती जाणीव काहीतरी टिपत होती. टिपताना नेणीवेत काही तरी रुजत होतं. साऱ्या हाल अपेष्टा, अडचणी, मानहानी यांच्यामुळे होणारा निरुत्साह, येणारी निराशा व पदोपदी भेडसावणारा अपुरेपणा कुणाचाहि कणा मोडणारा ठरतो. पण चॅप्लीनच्या बाबतीत? – चॅप्लीन टिकला. नुसता टिकला नाही तर ठाम पावले रोवून विस्तारला. फक्त विस्तारला नाही तर भाषा आणि प्रदेशाच्या सीमा ओलांडून मान्यता पावला. बरे,

मान्यता तरी कशी? अशी तशी नाही. राज्याची, गटाची किंवा राजकारणाची नव्हे. चॅप्लीनची जगप्रसिद्धि ही त्याच्या जगमान्यतेला समांतर आहे. समाजशास्त्रज्ञ, राजकारणी, शास्त्रज्ञ, इ. इ. नी त्याच्या मोठेपणाची दखल घेतली आहे. आईनस्टाईनसारख्या दृष्टया शास्त्रज्ञापासून महात्मा गांधींसारख्या मानव पुढाऱ्यापर्यंत सर्वांनी दाद दिली आहे. आज सत्त्याहत्तराव्या वर्षी नव्या चित्रपटाचा तो जेव्हा संकल्प सोडतो आणि तसा संकल्प तरुणाच्या तडफेने सिद्धीस नेतो, तेव्हा जगाचे कुतुहल चाळवले न गेले तरच नवल. हे सारे तो स्वतःच्या बळावर करतो. सर्व सूत्रे अशी फिरत असतात की तो स्वतःच सर्वांचा लक्ष्यबिंदू बनतो. इतर सगळे गौण व परप्रकाशित ठरत जाते. चॅप्लीनचा बोलपट म्हणजे सुसूत्रीकरण आणि नियंत्रण, छायालेखन व छायाचित्रण, उत्पादन आणि संपादन, कथा, संवाद लेखन व दिग्दर्शन, भूमिका व काही वेळा (जेव्हा आवश्यक) संगीतहि — सबकुछ चॅप्लीन असते. आपल्या बोलपटांची वितरण व्यवस्थाहि त्याचीच असते. इतकी सगळी अंगप्रत्यंगे सारख्याच एकाग्रतेनं हाताळली जातात. हाताळली जात असताना चॅप्लीनच्या बोलपटासंबंधी सतत उत्कंठा (तो प्रकाशित होण्यापूर्वीहि) वाढत जाते. मला आठवते की, गेल्या पिढीतले एक निष्ठावान् लेखक श्री. केशव सदाशिव केळकर हे हैद्रावादेहून मुंबईस केवळ चॅप्लीनचा 'मॉडर्न टाईम्स' हा बोलपट पाहावयास गेले होते. . . तो केव्हा प्रकाशित होतो याची ते कितीतरी दिवसापासून वाट पाहत होते.

[४]

चॅप्लीनचे आजचे यश हे त्याचे प्रथमपासूनचे यश नव्हे. सत्त्याहत्तर वर्षांचा चॅप्लीन हा कळसाला पोहोचलेला कलावंत आहे. गेली पंचवीस वर्षे त्याची कळसावर करामत चालू आहे. कलेचा कस कळावयास व कलेला सातत्य यावयास कलावंताला दीर्घायुष्य लाभणे अतिशय पूरक असते. 'चाळीस वर्षांपूर्वीचा चॅप्लीन' असा आढावा घेऊ लागला तर तुरळक यशाची व मान्यतेची पावती सापडते. परन्तु भरघोस यशाचा भरपूर दाखला मिळत नाही. म्हणजे असे की, चॅप्लीन जसा आपल्या कौटुंबिक जीवनात हिंदकळत होता तसाच खुद्द स्वतःच्या व्यावसायिक जीवनात बराच काळ हेलकावत राहिला. दोन्ही पातळीवर चॅप्लीन पडझडीतून गेला. या पडझडीतूनच त्याच्या व्यक्तिमत्वाची आणि कलाजीवनाची जडण-घडण झाली. उमटलेल्या व्रणाचे गुण झाले आणि जे प्रतिकूलतेचे वार बसले ते भार बनले नाहीत. त्याला धीर करून राहिले. आईच्या निर्व्याज वात्सल्यात वाढत असताना त्याची जगण्याची शक्ति जीवनात मूळ धरत गेली. जी आई अपार कष्ट झेलत व संकटांना तोंड देत त्याला जीवनात संरक्षत आणि संवर्धत होती, ते जीवन पाठ फिरवण्याकरता नाही तर जगण्याकरता आहे या कल्पनेने त्याच्या जगण्याला चिकाटी, धैर्य आणि कळा आणली. व्यावसायिक जीवनात म्हणूनच त्याला अपयश किंवा आर्थिक अस्थिरता चलित करू शकली नाही. फलित पदरात पडत नाही म्हणून कच खाल्ली नाही. लाईन बदलली नाही. फार्म धुंडाळत बसला नाही. ज्या फार्मने आरंभ केला त्यानेच त्याच्या व्यक्तिमत्वाच्या नाना कळा जागृत होत गेल्या आणि कळ्या उमलत गेल्या. म्हणून तर आज चॅप्लीन म्हणू शकतो की मी मरेपर्यंत चित्रपट निर्माण करीत राहीन आणि सदा माझा शेवटचा चित्रपट हा पूर्वीच्या सगळ्या चित्रपटाहून उत्तम असेल सर्वश्रेष्ठ असेल.

[५]

चॅप्लीन हास्यकार म्हणून ज्ञात आणि ख्यात आहे. मूकपटाच्या जमान्यात सर्वांना आपल्या बारीक हालचालीने हसायाला लावून 'लोटपोट' करणारा हा कलावंत आपल्या कोणत्याहि चित्रपटात आणि बोलपटात क्वचित हसतो आणि फार कमी बोलतो. त्याच्या बोलपटातील गति, कृति, घटना-घटित यांचा एकंदर











प्रपंच पाहिल्यास असं लक्षात येते की, संगति आणि विसंगति, संवाद आणि विसंवाद, स्रोत आणि प्रवाह यांचे अर्थमय सूत्र स्थूल नसते, सूक्ष्म असते असं कमीत कमी शब्दांचा आणि आवि-र्भावांचा वापर करून त्याला दाखवायचे असते. लौकिक जीवनाचा गाडा प्रगतिपथावर येणे प्रवृत्तिवर अवलंबून नसून बहुतेकांना प्रतिकूल परिस्थिति हीच वस्तुस्थिति मानून जीवन कंठावे लागते. हे लक्षात न घेतल्याने फोल आशा व घोर निराशा पदरी येत जाते व माणसाची आयुष्य क्रमण्याची केविलवाणी व हास्यास्पद वाटणारी कसरत सुरू होते. माणसाची ही दु:खांतिका शोकांतिकेकडे घसरत चालल्यामुळे जगण्यात भयभीत झालेली माणसेच अधिक. हे सांगायला आणि दाखवायला शब्दांचा फापट-पसारा कशाला ? खुद्द चॅप्लीनने दु:ख मूक राहून पाहिले. सोसले. भोगलेहि. या दु:खातहि माणसाला तारणारे वात्सल्यपूर्ण कारुण्य त्याच्या प्रत्ययास आले. चॅप्लीनच्या सुरवातीच्या चित्र-पटातूनहि हे व्यक्त झाले. कधी अस्पष्ट तर केव्हा धूसरतेने. त्याच्या विदूषकी चाळ्यानी जो चटका लावला तो केवळ हास्य पिकवतो म्हणून नव्हे. ती ती व्यक्तिरेखा (किंवा यथार्थतेने वल्ली) हसणाऱ्याला अशी चाटून जाते की, ते चाटून जाणे विजेचा संपर्क लागावा तसे चित्ताला भिडून जाते. ज्या आईने कसोशीने चॅप्लीनपर्यंत दु:ख व दारिद्र्य पोहोचू नये याची फडफडत धडपड केली त्याचा चिरकालीन ठसा चॅप्लीनवर उमटला आणि त्याच्या कलाविष्का-राचे प्रधान अंग जे हास्य त्याला कारुण्याचा स्थायीभाव लाभला. पुढे व्यवसायातले टक्केटोणपे आणि भरती ओहोटी यानी, त्याला लवकरच माणसे कसे अवधान गमावतात याचा साक्षात्कार झाला. त्याच्या भावनेत मुरलेल्या कारुण्याला या अनुभवाची जोड-मिळाली. चॅप्लीनची एक एक भूमिका मागे पडून त्याचा एक एक चित्रपट नवी दालने उघडू लागला. एक अन्वर्थक योगायोग असा की, चॅप्लीनने बोलपटाची लाट आली तरी मूक चित्रपट चालू ठेवले. त्याचा पहिला बोलपट 'मॉर्डन टाईम्स' ची जाहिरात 'चार्ली बोलला' अशी करण्यात आली. पण 'मॉडर्न टाईम्स' मधे, विज्ञानपूत जीवनात मनुष्याचे जीवन काही सुधारत नाही आणि त्याचे परावलंबित्व काही कमी होत नाही अशा सुराचा जो ध्वनि आरपार होता तो रजत-सृष्टीवर अपूर्व होता. याच बोलपटात तुरुंगातून कैद्याला सोडतात तेव्हा तो म्हणतो, 'मी येथे आरामात आहे' चॅप्लीन बोलला आणि शब्दाला अशी परिमाणे निर्माण होत गेली.

[६]

गेल्या युद्धानंतर, विशेषत: पाश्चिमात्य लोकांचे जीवन अगदी मुळापासून हादरले. औद्योगिकरणाची वाटचाल भौतिक जीवन एकीकडे समृद्ध करून होती तर दुसरीकडे माणसाला उपजीविकेचा 'सम' साधणे कठिणतर होऊन बसले. घोषणा अनेक झाल्या आणि दूषणे अनेक आली. 'मम्' म्हणवणारे जसे कमी झाले तसे 'ममत्व' असलेली माणसेहि कमी झाली. एक प्रकारचे भयंकर वैफल्य ग्रासून गेले. 'बांधणी' म्हणून काही असते तिची 'धारणा' गेल्याचे भासले. चॅप्लीनने हे बारकाईने पाहिले. त्याचीच रवंथ करत राहिला आणि याच भूमिकेतून त्याचा अतिशय गाजलेला 'मॉसिएवर्ड' नावाचा बोलपट निर्माण झाला. वास्तविक या बोलपटाच्या कथाविषयाची मूळ कल्पना आर्सेन वेल्स या प्रख्यात लेखक नटाची. आपण यावर बोलपट काढू असं वेल्स चॅप्लीनला म्हणालाहि. परन्तु चॅप्लीन त्या वेळेस तयार नव्हता. परन्तु तीच कल्पना चॅप्लीनच्या चिंतनात बाळसे धरू लागली, तेव्हा एक समर्थ कृति म्हणून बाहेर पडली. या बोलपटातला नायक युद्धामुळे नोकरी गेलेला एक कारकून आहे. जेव्हा काही केल्या आपल्या बायका पोराना वैध मार्गाने जगवणे शक्य नाही असं त्याला पटतं तेव्हा तो कोणत्याहि मार्गाने पैसा मिळवला पाहिजे या निर्णयाप्रत येतो व त्याचे आयुष्य बदलते. कामातुर प्रौढ श्रीमंत बायकाना बनवून त्यांच्याशी प्रेमाचा देखावा करणे, त्यांच्याबरोबर लग्न लावणे आणि त्यांची संपत्ति लुबाडण्याकरिता त्याना जिवानिशी मारणे असा 'धंदा' तो कारकून सुरू करतो. हा कारकून आपल्या वैयक्तिक जीवनात मुलाने नुसती मनी मांजरीची शेपटी ओढली तरी 'हिंसेने हिंसा वाढते' असा त्याला दम भरतो. बागेत वृक्षवल्लींची निगा अशा नाजूकतेनं व संवेदनक्षमतेनं राब-वतो की शाखेच्या पानावरून खाली निखळलेला किडा अलगद त्या पानावर ठेवतो. हा कारकून काय व्यावसायिक उपद्व्याप करतो हे [illegible] नाही. पकडला जातो. त्याला कोर्टात उभे करण्यात [illegible] विचारण्यात येते की तो हे काय करत होता. त्याला तो [illegible] देतो 'धंदा'. 'फक्त मोठ्या प्रमाणावर' अशा प्रति-[illegible], 'कोणताहि धंदा मोठ्या प्रमाणावर [illegible]'. नंतर त्याला विचारण्यात येते की, 'अरे, हा धंदा [illegible] हा तर फार मोठ्या प्रमाणावर लोकांची कत्तल [illegible] चॅप्लीन उत्तर देतो 'मोठ्या प्रमाणावर म्हणाल तर मी amateur ठरेन. कारण, मोठ्या राष्ट्रांनी हे फार मोठ्या प्रमाणावर [illegible] आहे.' असा हा कारकून दारूहि कधी [illegible] संथपणे पावले टाकायच्या [illegible] विचारतो, 'तुझा तुझ्या आत्म्याशी काही झगडा' [illegible] 'मुळीच नाही. माझा झगडा माणसाशी आहे.'

[७]

किड, गोल्ड रश, डिक्टेटर, लाईमलाईटस् आणि या लेखात उल्लेखिलेल्या 'मॉसिए वर्दू' व माडर्न टाईम्स् या चित्रकृतींतून एक विशिष्ट कथावस्तु अधिकाधिक परिणामकारक करण्याचा प्रयत्न आहे. 'किड' उत्कट आहे. 'गोल्डरश' त्या मानाने सौम्य आहे पण उपरोधिक आहे. 'डिक्टेटर' ही हिटलरवरची उपहासिका खरी. पण या बोलपटात चॅप्लीनमधला विदूषक त्याच्यातील कलावंतावर मात करून गेला. या चित्रपटातील नाटय त्या मानाने स्थूल आहे. लाईमलाइटस् अधिक गंभीर आहे. कुणी टीका केली, की चॅप्लीनच्या जीवनावर हा बोलपट प्रकाश टाकतो. लक्षात घेण्याचा विशेष असा की चॅप्लीन या प्रत्येक बोलपटाच्या द्वारा वेगळे विश्व सादर करत होता. म्हणून तुलना पांगुळत होती. चरफडणारा टीकाकार चवताळला नसता तरच नवल.त्यात'मॉसिए वर्दू'पासून चॅप्लीन साम्यवादातून डावा वनत चालल्याच्या अफवा पसरल्या. याची परिणति १९५२ साली दिसली. चॅप्लीनच्या अमेरिका निवासाला एव्हाना वेचाळीस वर्षे झाली होती. चॅप्लीन सहलीवर असताना त्याला कळले की त्याचे अमेरिकन नागरिकत्व रद्द केले गेले. अमेरिकेत परतण्यास प्रतिबंध झाला. चॅप्लीनला हा तडाखा असह्य झाला म्हणतात. कुणी म्हणतात की चॅप्लीनला अफाट उत्पन्नातून कर देण्याची समस्या कशी सोडवावी अशी जी चिंता होती तिच्यातून यामुळे त्याची आपसुखच सुटका झाली. कारण काही का असेना पण त्याचा अतिशय गाजलेला (आणि इ. स. १९५७ साली निघालेला) 'ए किंग इन न्यूयॉर्क' हा बोलपट म्हणजे त्याची उग्र प्रतिक्रिया होय. हा बोलपट अमेरिकेत दाखवला गेला नाही.

[८]

मधून मधून काही प्रवाद असे ऐकू आले की चॅप्लीन आता यापुढे बोलपट काढणार नाही. प्रसिद्ध अमेरिकन लेखक ओनेलची मुलगी त्याची पत्नी झाल्यावर त्याच्या कौटुम्बिक जीवनाला स्थैर्य आणि सातत्य आले. स्वीट्झरलंड येथे त्याच्या स्वतःच्या ३७ एकर भूमीवर वनश्रीने नटलेल्या व वेष्ठिलेल्या प्रासादात आता तो नुसते सुखाचे दिवस मोजत कालक्रमणा करणार. आता त्याला काय कमी आहे ? सुंदर पत्नी, भरपूर मुले, अपार संपत्ति आणि जगभर प्रसिद्धि आणि मान्यता. कुणाला झाले तरी या परीस अधिक काय हवे असते ? ज्या माणसाच्या आयुष्यात बायका, लफडी यांचाच बोलबाला अधिक झाला त्याला उत्तर आयुष्यात कौटुम्बिक सुख मिळाल्यावर तो आणखीन त्रास कशाला करून घेईल? त्यात आर्थिक उन-सावलीचा जीवघेणा खेळ जाऊन समृद्धीची शीतलता सातत्याने वाटचास आल्यावर करायचे म्हणून काय शिल्लक उरते ? ओना ही चॅप्लीनला सुख, समाधान देणारी सहचारिणी मिळाली हे खरे आहे. त्याला या बायकोपासून आठ मुले झाली आहेत. त्याला काही कमी नाही हेहि खरे आहे.परन्तु यामुळे संपणारा कलावंत चॅप्लीन नाही. एक परिपक्व झालेला कलावंत म्हणून चॅप्लीनकडे पाहणे आवश्यक आहे. या कलावंताचे मन अजून संवेदनक्षम व सृजनशील आहे. चॅप्लीन एक आत्मचरित्र लिहिणार आहे हे कळल्यावर एक प्रसिद्ध स्त्री कादंबरीकर्ती म्हणाली, 'मला आशा आहे की, आपण सत्य काय आहे ते सांगण्याचे धाष्टर्य कराल'. चॅप्लीनला वाटले की, ती त्याच्या जीवनात जे राजकीय वादळ उठले त्या अनुषंगाने बोलत आहे. परन्तु तिचा रोख चॅप्लीनच्या 'कामजीवनावर' होता. चॅप्लीनने, आपल्या जीवनात 'काम' हा कधीच बोलविता धनि म्हणून राहिला नाही याचे जे विवेचन केले आहे ते फार उद्बोधक आहे. तो म्हणतो :

'Unlike Freud, I do not believe sex is the most important element in the complexity of behaviour. Cold, hunger and shame of poverty are more likely to affect one's psychology. Like everybody elses' my sex-life went in cycles. Sometimes I was potent, other times disappointing. But it was not the all-absorbing interest in my life. I had creative interests which were just as all-absorbing.'

असं असूनहि कामजीवनाचे सर्व तपशील आत्मचरित्रात कां येऊ नयेत याबद्दलचे त्याचे कथन अधिक महत्त्वाचे आहे.

'However, in this book I do not intend to give a blow-by-blow description of a sex-bout. I find them *inartistic, clinical* and *unpoetic*.'

(इटालिक शब्द मुद्दामच केले आहेत)—यावरून चॅप्लीनच्या कलावंत मनाची साक्ष मिळते. खूण पटते.

[९]

कलावंत कधीच स्वस्थ राहू शकत नाही. वरवर तो स्वस्थ भासला तरी आतून तसा नसतो. चॅप्लीनला अलिकडे जेव्हा कुणीतरी तो त्याचा नवा बोलपट ' ए कॉउन्टेस फ्रॉम हांगकांग' निर्माण करताना म्हणाले की, 'तुमच्या मनात कथाविषय इतकी वर्षे घोळत होता तर आताच का बोलपट निर्मितिकरता उद्युक्त झाला'—मग उत्तर येते की सोफिया लॉरेनला त्याने पाहिल्यावर त्याच्या लक्षात आले की त्याच्या कथानकाला सुयोग्य नायिका मिळाली. हे लक्षात येण्याचा अवकाश की मग चक्रे गतीने फिरू लागली. चॅप्लीनच्या या बोलपटात दुसरा आणखीन् एक श्रेष्ठ नट काम करत आहे. त्याचे नाव मार्लन ब्रॅन्डो. सोफिया लॉरेन व ब्रॅन्डो दोघानाहि या कलावंताच्या हाताखाली काम करण्याचे 'सुदैव' लाभले वाटते. जशी कथा व कथाविषय कणाकणाने चॅप्लीनच्या मनात जुळत जातात तद्वत त्याचे दिग्दर्शन हेहि बारीक तपशिलातून आपली सजीवता साकारून घेते. मनासारखे होईपर्यंत स्वतः चॅप्लीन गप्प बसत नाही आणि इतरानाहि स्वस्थ बसू देत नाही. काम म्हणजे काम. असे काम की पूर्वीचे मागे सारणारे आणि म्हणावयास लावणारे 'असं पूर्वी झालं नव्हतं आणि नंतर होणार नाही.'

अशी जिद्द आहे म्हणून चॅप्लीनचे मन समाधानी व निर्लेप राहिले आहे. काम आटोपून पुन्हा स्वस्थतेनं तो बसतो. 'काही वेळा संध्या समयी गच्चीवर बसून तळ्यापर्यंत पसरलेल्या विस्तृत हिरवळीकडे आणि तळ्यापलीकडे आश्वासन देणाऱ्या डोंगराकडे पाहतो आणि या अवस्थेत त्यांचं निरामय वैभव उपभोगण्याशिवाय दुसरा विचार करत नाही.' असं जे त्यानं आपले विस्तृत आत्मचरित्र संपवताना म्हटले आहे त्यात त्याच्या रसिक व कलावंत मनाच्या विदग्धतेचे रहस्य दडलेले आहे. ● ● ●



अनुक्रमणिका

[३]



# 'आपणचि दडी मारोनि राहे—'

येशू एकदा एका गणिकेच्या उद्यानात आला आणि झाडाखाली बसला. आव नाही. आयास नाही. प्रभूचा पुत्र विश्वमातेच्या अंकावर विराजला. असं ते ध्यान पाहून ती गणिका उद्गारली : His body was single and each part seemed to love every other part.

मानवी देहाचा आणि निसर्गाचा काय संबंध? माती म्हणजे प्रकृति, प्रकृति म्हणजे चैतन्य व शक्ति आणि चैतन्य व शक्ति म्हणजेच चित् शक्ति. आकार, गति, आणि कृति म्हणजे देह. तीहि मातीतूनच आलेली. मानवी देह म्हणूनच निसर्गाची एक प्रतिकृति. या देहाला रूपे आणि स्वरूपे, भाव आणि आविर्भाव, अंगे आणि प्रत्यंगे, आस आणि कास, सोस आणि ध्यास, वेध आणि शोध, लावण्य आणि सुगंध, माधुर्य आणि सौंदर्य, दिव्यत्व आणि अमरत्व असा अनंताच्या क्षितीजाला समांतर असणारा व्याप व विस्तार येतो. परिमाणे निर्माण होतात आणि पैलू पडतात. एका अर्थाने जे जे म्हणून 'बाहेर' विलसत, उल्हसत, आणि खदखदत असते ते 'भीतर' असतेच. बाहेर आणि भीतरची वेव्ह लेंग्थ जुळली की अंतर नाहीसे होते. स्थूलत्व लोपते. सूक्ष्मता जाणवते.

— परन्तु बाहेर–भीतरचा संवादीपणा असा सहज साधत नाही. दिसत नाही. कारण प्रत्येकाचे व्यक्तिमत्व वरवर एक असते पण ते अनेक नी अवगुंठित बनते. या अनेकांचा अभेद होणे म्हणजे अस्मितेचे अद्वैत. ही भाषा अध्यात्मिक वाटते. परन्तु त्यात तसे अप्राप्य किंवा दुर्बोध असे काही नाही. श्रीकृष्णाची मुरली रवरव करू लागताच माणसे कर्णमय होत. घराघरातून स्त्री एका मंजुळ मुरलीचेच अस्तित्व अनुभवे. श्रवणेन्द्रियांच्या दारी सारी इन्द्रिये जमा होत. त्यात विलीन होत. बावरी राधा हा त्या सर्व देहभान विसरलेल्यांचा उत्कट प्रतिनिधि. नादलुब्धा राधा म्हणजे श्रवणार्पणाचा परमोत्कर्ष. यातूनच भक्ति–प्रेमाचा रसोत्कर्ष. एका सूरात सर्व व्यक्तिमत्व अशा, झोकात येते की ऐकणारे व्यक्तिमत्व अशरण राहू शकत नाही. यातच ते एक आणि एकसंध होते. मग दूरत्व आणि परत्व तकलादू ठरते. ते शाररीक आणि व्यावहारिकच असते. टागोरांच्या एका गद्य काव्यात एक लहानगा आपल्याहून जरा मोठ्या (लहानग्या) दादास म्हणतो "जेव्हा सायंकाळी पूर्ण चंद्रमा कदंब वृक्षात गुरफटतो तेव्हा त्याला कुणी कां पकडत नाही?'

दादा त्याला उपहासाने म्हणतो 'अरे बाळा, मला माहित असलेल्या सर्व मुलात तू खुळा' पाहा. अरे, चंद्र आपल्यापासून इतका दूर आहे की, कुणास तो कसा पकडता येईल. ?

लहानगा पुन्हा म्हणतो 'दादा किती मूर्ख रे तू? आपण खाली खेळताना आई खिडकीतून आपल्याकडे पाहून हंसते तेव्हा ती आपल्यापासून दूर असते असं का तू म्हणणार?

तरीहि दादा लहानग्यास शहाणपण शिकवतो 'तूं एक विनडोक मुलगा आहेस! पण, बाळा समज, तू म्हणतोस त्याप्रमाणे चंद्राला पकडायचे ठरवले तर तेवढे मोठे जाळे तुला मिळेल काय?'

मग लहानगा दादास पुन्हा म्हणाला 'त्यात काय? नक्कीच हाताने चंद्राला पकडता येईल.—'

तरी दादा हंसला आणि म्हणाला 'आता काय सांगावे तुला? तुझ्यासारखा विचित्र मुलगा दुसरा नसेल. अरे, वेड्या चंद्र जवळ आला तर तुझ्या लक्षात येईल कीं तो किती मोठा असतो ते?'

लहानग्यास राहवले नाही आणि तो म्हणाला 'तुझ्या शाळेत कार्य गचाळ गोष्टी तुला शिकवतात! अरे खुळ्या, जेव्हा आई आपला मुका घ्यावयास आपल्याजवळ तोंड आणते तेव्हा तिचा चेहरा का मोठा दिसतो?'

—बाहेर–भीतरचे अंतर लोपले म्हणजे असे होते. केवळ सामीप्य नसते. जडत्व जाते. 'अस्' तरल असते. त्याचा प्रत्यय येतो. जीवनावरचा पडदा बाजूला सरकतो आणि गूढ उकलते. गूढ उकलताना व्यक्तिमत्व उमलते. या व्यक्तिमत्वाच्या उमलण्यात नाना कळा जागृत आणि बोलक्या होण्याचे सौंदर्य आहे. आपण नाना सुखांच्या कल्पना आणि तुलना करून सतत स्वतःपासून दूर जातो आणि स्पर्श,

सुगंध, सूर, रंग रूप व शब्द यांच्या चमत्काराना पारखे होत जातो.

—अंथरुणात उबदार दुलईत आळसटलेले शरीर एखाद्या पहाटे कुशी बदलते. बदलताना जरा शरीर उघडे पडते आणि गार वाऱ्याची झुळुक शरीराला चाटून जाते. शरीरात एक सळसळ निर्माण होते. आळसाशी संगत करू पाहणाऱ्या देहातील संवेदना वाऱ्याने चुंबित आणि कंपित असते. पापण्या अर्धोन्मिलित आहेत, अस्ताव्यस्त झुलपे कपाळावर ओणवली आहेत आणि जाग व प्रकाशाची उघड-झाप चालू आहे–, अशा अवस्थेत सहज-ग या देह अंथरुणातून उठतो, परित्यक्त आळस चादरीच्या सुरकुत्यात जळफळत पडतो, उठलेल्या देहाला ते अंथरुण पाहवत नाही आणि ते गार वारे सहस्र-मुखांनी आपणास बोलावत असल्याचे अनुभवतो आणि उघडचावर येतो—

—तिथे रंगाचा, प्रकाशाचा, वाऱ्याचा असा काही और खेळ व विलास चाल-लेला असतो की भान हरपते. जगात दुसरे काही आहे याची जाणच नसते. सगळा निसर्ग अशी कळा धारण करतो की पंचमहाभूते एक प्रसन्नताच आळव-तात. फुले, पालवी, धरती, पशुपक्षी आणि पाना पानावरच्या रंगात एकरूप झालेले किडेहि असे टवटवलेले असतात की श्वास रोधून नुसते पाहत राहावे आणि जेवढे शक्य आहे तेवढे अधाशीपणाने साठवून ठेवावे..........

—अशा अभूतपूर्व आणि अवर्णनीय आनंदाचा स्रोत सुरू होतो की, मग ती अवस्था जाऊ नये, जपून ठेवावी या भावनेचा अमल येतो. वाटते की, असा आनंद पूर्वी अनुभवला नव्हता आणि पुढे अनुभवणार नाही. स्मृति आणि मानसिक साहचर्य चाळवले जाते. अशी पहाट केव्हा पाहिली होती? असा वारा केव्हा गुद-गुल्या करून गेला होता? असे मनोहारी रंग कुठे चेटूक करून गेले? असा निसर्गाच्या आणि देवाघरच्या आनंद सोहळ्याचा चमत्कार कधी पाहिला होता?—

— आठवते व वर्तमानातून स्थित्यंतर करत मन भूतकालात धावते, स्थिरावते आणि परक्या प्रमाणे तो 'स्वानुभव' डोळ्यापुढे येतो. आनंदीची आणि माझी भेट राहिलेली नसते. प्रीत झालेली असते. कुणाचा विरोध नसतो. मिलनाचा रंग भरतो. त्या नदीकाठी देवासमोर मिल-नाचा सुवास उघळावयासच जणु वारा धावून आलेला असतो. त्या रंग गंध लेवून हुंदडावयास निघालेल्या वाऱ्यास उजळवून टाकावयास प्रकाश फाकत असतो....पक्षाना फुटलेला कंठ वायु-मंडलाला नादब्रह्मात गोवत असतो...

—काय गेल्या पंचवीस वर्षात अशी पहाट फक्त दोनदाच उदीत झाली? रोज उगवणारा सूर्य आणि फुलणारी कुसुमे काय या अवधीत सन्यस्त आणि व्रतस्थ झाली होती? पानापानावर आणि कण-कणावर आपल्या सजीवतेची खूण उमट-वणारे जीवन काय नास्तीकले होते? काय झाले होते?—आपण तर दररोजच उठत होतो, पहात होतो, आयुष्य कंठत होतो आणि दिवसामागून दिवस जात होते. कधी असे झाले नाही?—आजच, इतक्या वर्षानी ही पहाट कशी स्वर्गाचा आशिर्वाद घेऊन आली? कुठे खोळंबले होते जीवन? कुठे अडकले होते जीव-नाचे लास्य?—आणि असा एखाद्या पंडिता-सारखा बुद्धिशोध घेऊन तरी काय बोध होणार आहे? चला, जी पहाट आल्हादून आली तिचे स्वागत करू आणि तिला आयुष्यात प्रविष्ठ करू——

पण ती कुठे आहे? कुठे नाहीशी झाली? तो वारा, ते रंग, तो गुंजारव आणि त्या सर्वांचे सम्मीलन व संगीत क्षणात कसे नाहीसे झाले? अरे, उन्हे चांगलीच पोळू लागली. निदान पूर्वीची ती पहाट स्मृतीच्या चिमटीत तरी पक-डता आली, पण ही पहाट पाऱ्यासारखी निघाली. पाहता पाहता निसटली. चला जी पहा आपण पकडली तेच संचित समजू...त्या पूर्वीच्या पहाटेकडे पाहिले आणि एकदम चरकलो. धक्का बसला. त्या पहाटेचा स्वानुभाव निश्चित पडलेला असतो! म्हणजे दोन्ही घालवून बसलो.. गडी म्हणतो 'बाई चहाची वाट पाहताहेत.......' मन एकीकडे, विचार दुसरीकडे आणि शरीर चहाच्या टेबलाकडे असे त्रिधा होते अस्तित्व.....

—एक ख्यातनाम संगीतज्ञ --आपली संगीतशिक्षा संपवून, प्रावीण्य मिळवून आणि कृतार्थ बनून बेसूर दुनियेत 'आता सूर ऐकवू' अशा थाटात व ऐटीत बाहेर पडला. त्याने भरपूर मेहनत घेतली होती, मनोभावे गुरूची सेवा करून त्याला प्रसन्न केला होता. गुरूच्या प्रतिभेचा गुण हेरला होता. आणि मुरावट आणि खुला-वटीतल्या खुब्या कंठस्थ केल्या होत्या. राग आणि सूर, साधना आणि तपश्चर्या यांच्या बळावर त्याने आपल्या कब्जात घेतले होते. वाकवावा तसा आणि वाढवावा तितका गळा तयार होता. त्याच्या पलीकडे सूरांचे आणि संगीताचे जग असते व आहे असे त्याचे ज्ञान व आत्मविश्वास मानावयास तयार नव्हता.....



अनुक्रमणिका



वात्रटिका

प्रात्यक्षिक

ब्राह्मणआळीतला भटजी
होता अमळ पाजी
'हात.ला हात लावा' म्हणायचा
नि प्रात्यक्षिक करून दाखवायचा !

—तो आपल्या मस्तीत असाच रस्त्यावरून चालला होता आणि त्याच्या कानाचा पडदा हलला. तो साधा सुधा आवाज नव्हता. नेहमी ऐकण्यात येणारा ध्वनि नव्हता. अपरिचित होता. अपूर्व वाटला. चित्ताला जाऊन भिडला. अंतः-

प्रमुदित होत असतानाच कान निवत असल्याचा संतोष आला. असा सूर ऐकला नव्हता. तसा स्वर काढला नव्हता. अनुभवात आणि ज्ञानात वसत नव्हता. आणि वसत नव्हता तरी सारखा ऐकावा अन् ऐकत राहावे वाटत होते. त्याला जाणवले की, आपण एवढे शिकलो, इतके टीपले व अनेकांनी आपण स्वरसम्राट असलेल्या गुरुवर मात केली असा अभिप्राय व्यक्त केलेला असला तरी हा सूर काही जमणार नाही. मेहनत केली तरी विनायास कंठातून मुरावटणार नाही. हा काही मर्त कुडीच्या गळ्यातून सुस्वर होऊन गोचर झालेला नव्हे. दैवी माधुर्याने न्हाल्लेला हा सूर नक्कीच अज्ञातातून झंकारत आहे......

परन्तु असे तरी कसे म्हणावे? कान ऐकत होते, ते खोटे कसे मानावे? आनंदाने सारी 'अस्मिता' केवळ त्या सूराचा कानाच्या पडद्यास हळुवार स्पर्श होताच खुलली होती ते काय केवळ स्वप्न होते? —संगीतज्ञाचे पाय त्या मधुर आलापीच्या दिशेने चालू लागले. चालता चालता संगीतज्ञ एक साधूच्या पुढ्यात येऊन उभा राहिला. साधू गातच होता. त्याचे कुणाकडेच लक्ष नव्हते. कसले भान नव्हते. पण गाताना एकहि अवयव हलत नव्हता. जबडा पण फारसा वासला नव्हता. एकतारीचीच काय ती साथ होती. तिच्यावर त्याची निमूळती व लांबूळकी बोटे लिलया फिरत होती.

—गाणे संपले. संगीतज्ञाच्या मनावर त्या अवीट गाण्याची मोहिनी पडली होती. तो साधू मात्र गाणे संपले तरी नादातच होता. विदेहि भासत होता. संगीतज्ञाने नम्रतेनं साधूला विचारले 'बाबा हे गाणे कुठले?' साधूची समाधी भंगली. त्याने विचारले 'अं, काय?'.

"आपण जे अलौकिक सूर आळवत होता ते गाणे कुठले?" संगीतज्ञाने पुन्हा अदबीने विचारले.

'आंतले–' छातीवर पंजा ठेवून साधू उद्गारला आणि पुन्हा 'तथास्तु' झाला. जणू त्याचा राग ऐकू येणे बंद झाले होते तरी वस्तुतः तो बंद झाला नव्हता. त्याच्या अक्षय्य संगीताची मैफील अखंड जागरणात होती—"

—व्यक्तिमत्वात 'सम्' आला की, त्याचे उन्नयन येतेच. उन्नयनात एकात्मता आहे. माणसाचे अवयव वेगळे खरे पण एका देहात व एकच जिवात गोवलेले आहेत. याचा मनस्वी तलास जेव्हा घेत नाही तेव्हा अवयव गुंतले असे समजून वेगळालेपण कल्पितो आणि आपण अक्षरशः विभागतो. आतली शकले पडतात. या शकले पडण्यालाच आपण पृथगात्मता व स्वतंत्रता असा शब्द योजिला आणि शब्दातील नाजूक सूक्ष्मताहि नष्ट किंवा गुळगुळीत करून टाकली.

येशू एकदा एका गणिकेच्या उद्यानात आला आणि झाडाखाली बसला. आव नाही. आयास नाही. प्रभूचा पुत्र विश्वमातेच्या अंकावर विराजला. असं ते ध्यान पाहून ती गणिका उद्गारली 'His body was single and each part seemed to love every other part.'

—माणसांच्या अवयवांना केवळ इन्द्रिये म्हणून चालणार–भागणार नाही. कारण संवेदना आणि ज्ञान यांचे देणे माणसाला आहे. या दृष्टीने ज्ञानेन्द्रिये झाली. ही माणूस झोपला तरी कार्यरत असतात अशी त्यांची क्षमता आहे. ती एकत्र येतात व आणतात. इन्द्रियांची तोंडे बाहेर असतात. आपण बाहेर पाहतो म्हणूनहि तीहि बाहेर पाहतात. बाहेरचा आवाका आपल्या लक्षात यायच्या अगोदर आपण दिशा करतो आणि दृष्टी आणि इन्द्रिये पांगतात. वास्तविक मूळातले निसर्गसिद्ध एकत्व असे घालवतो. जीवनाभिमुख झालो तर इन्द्रिये आतहि पाहू लागतात आणि पाहून न पाहिल्यासारखे होत नाही....पाहण्याबरोबर 'असणे'हि चैतन्य देत जाते......

एकदा माझ्या मुलाबरोबर फिरावयास गेलो. वाटेत त्याला एक चिमुकला पक्षी दिसला. त्याला आवडला. त्याने त्याचे नाद घेतला. त्याच्याकडेच सारे विसरून पाहत बसला. मी काही अंतर पुढे गेल्यानंतर मला चुकल्यासारखे झाले. माझे बोट रिकामे होते. मी चांगलाच चरकलो. त्याच पाऊली मागे फिरलो. मुलगा मला सापडला तरी तो स्वतःला अजून हरवलाच होता. त्या पक्षाकडे अनिमिष नेत्रांनी पाहत होता. जीव त्याच्या डोळ्यात एकवटला होता....मी त्याला हलवले, पण तो यावयास तयार नव्हता. तसाच पक्षी आणून देण्याचे आश्वासन दिल्यावर त्याचे मन वळवू शकलो...

—पक्षी आणल्यावर मग त्याला अन्य काम उरले नाही. सदान् कदा त्या पक्षाची सोबत. एकदा काय झाले की, त्याला तो पक्षी बेचैन वाटला. त्याने त्याला जरा मोकळे करावयाची सूचना केली. मी सावधगिरीने ऐकली. पक्षास मोकळे केले. तो जरा उडाला आणि मुलगा ओरडला 'अप्पा, अप्पा, पकडा हो त्याला नसता पळून जाईल.......' मी धडपड करून पक्षास पकडला. माझ्या मुठीत तो फडफडू लागला. निसटण्याचा प्रयत्न करू लागला म्हणून मी जरा घट्ट धरले. थोड्याच वेळात फडफड थांबली आणि पक्षी गतप्राण झाला. मुलाने आकांत मांडला. मला दुसरा पक्षी आणण्याचे धाडस काही होईना. पुन्हा पक्षी उडायचा आणि त्याला असे पकडायचे की, तो उडताहि कामा नये आणि गुदमरताहि कामा नाही.......शरीराला ही सहजता नाही. नसन् नस् व स्नायून् स्नायू जड झालेला, मनावर कमालीचा ताण अशी आमची कालक्रमणा.....आम्ही जीवनहि असेच धरले आहे, धरले तर गुदमरते; सोडले तर हातातून निसटते... आम्ही अनेकातले एक अनुभवलेच नाही...

●●●

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

तसा व्यासंग—लेखनाचा ध्यास आजचा नाही. कालानुक्रमाने जुना आहे आणि गुणाने अजून आहे. निर्मितीत बुद्धिवाद प्रतिष्ठित असल्याने निवेदन साधार आणि अचूक असायचेच, असते. त्यांच्या व्यक्तिरेखा, कथा, आणि समीक्षा यांना असा संदर्भ आहे. याच्या जोडीस त्यांचे श्रवणेंद्रिय अश्राप राहिले असल्याने त्यांच्या गानलुब्ध कानांनी अस्सल ऐकण्याची संधी गमावली नाही.

—हे 'अजून'च्या बैठकीचे गांभीर्य.

प्रसिद्धि:—दर्जेदार मासिकातून कथा व समीक्षा प्रसिद्ध. 'कालिंदीच्या तीरावर' या कथेस गेल्या वर्षी पहिले पारितोषिक मिळाले.

य. दि. फडके

१. एक जीवन गाथा
२. संगीताची साधना
३. लंडनच्या रंगभूमीला हादरा देणारा नाटककार

# पैलतीर



"चार नंबर,' चार नंबर."

नर्सची कर्कश, खरवरीत आवाजातली हाक विनायकरावाना ऐकू येते. पण मिटलेले डोळे त्याना उघडावेसे वाटत नाहीत. खरं म्हणजे मघाशीच तिला त्यानी वॉर्डमध्ये शिरताना पाहिली आहे. ही वया आली म्हणजे सहा वाजले असणार आणि आता ती कडवट औषधाचा डोस पाजणार, म्हणून तर त्यानी आढ्याकडं पाहायचं सोडून देऊन डोळे मिटून घेतले आहेत. झोपेचं सोंग घेतलं तरी ही वाई ठरलेल्या वेळी आपल्या घशात औषध ओतणारच हे त्याना माहीत आहे. तरीही त्यानी डोळे मिटून घेतले आहेत. त्याना या नर्सचं तोंड पहावंसं वाटत नाही. या इस्पितळातल्या सर्वच नर्स म्हणवणाऱ्या वायावर त्यांचा राग आहे. पण त्यातल्या त्यात या वयेचा त्याना जास्त संताप येतो.

"चार नंबर, सो गये क्या ? चार नंबर."

अंथरुणावरून उठून तिच्या मुस्कटात एक भडकावून द्यावी असं विनायकरावांना वाटतं. पण डोळे उघडून तिच्याकडं ते रागानं पाहातात आणि हात हलवून औषध नको म्हणून सांगतात.

“इतके दिवस सारखं वाचण्यात आयुष्य घालवलं. काय मिळालं ? नुसते शब्द....आपण हे सगळं वाचतो ते सारं खोटं असतं. खरं फक्त एक—मरणाची वाट पाहात राहाणं. आगाशे खरं सांगतो, I am dying”. आणि आगाशे घड्याळाकडं अस्वस्थपणानं पाहू लागतो. ह्या म्हाताऱ्याशी बोलायला त्याला शब्दच सापडत नाहीत.

“दवा नही मंगता ? रातको खाली-पिली बोंब मारेगा तो हम नही आयेगा. हम डॉक्टरसावको ‘कंप्लेंट’ करेगा.”

विनायकराव काहीच बोलत नाहीत. प्लास्टरमध्ये पाय असलेला तीन नंबर हसतो. त्या पोऱ्याच्या बिछान्याशेजारी गोळा झालेले, त्याला भेटायला आलेले त्याच्या घरचे लोकही एकदम पाहू लागतात. कडवट औषधाचा घोट विनायकराव निमूटपणे घशाखाली उतरवतात. आपलं काम आटपून परत फिरत असलेल्या नर्सकडं बघून त्याना वाटतंय् :

“हिच्या साऱ्या अंगाला ठणका लागावा, मधूनच असह्य कळा याव्यात आणि रात्रन् रात्र तळमळत महिनेन् महिने ही एकदा इस्पितळात पडावी म्हणजे समजेल . . . खालीपिली बोंब मारतो काय ?. .”

नर्स आता ‘पाच नंबर’कडे गेली आहे. तिथला गलेलठ्ठ गुजरायी शेटजी तिच्याकडं बघून तोंड भरून हसतो आहे. आणि उगाचंच मांडी कराकरा खाजवतो आहे. त्याचं ब्लडप्रेशर वाढतं म्हणे. हार्ट अॅटॅक आला होता. विश्रांतीसाठी आलाय्. सारखा चरत असतो. त्याची अंगानं वेडीवाकडी सुटलेली बायको रोज चार ते सात त्याच्या अंथरुणावर त्याला खेटून बसते आणि गुलूगुलू बोलते. आताही ती बसलेलीच आहे मोसंबं सोलीत. मधूनच ती नव्या नवरीसारखी लाजते. डोळे वटारून लटक्या रागानं नवऱ्याकडं पाहते, तिचा गलेलठ्ठ नवरा सुटलेल्या पोटावरून हात फिरवीत तोंड भरून हसतो. विनायकरावाना त्याची चीड येते. ते पुन्हा आढयाकडं पाहू लागतात. मधूनच एकदा समोरच्या दरवाज्याकडं पाहात.

. . . अजून कुणी नाही आलं. आता कुणी यायचंही नाही बहुधा. आलाच कदाचित् तर केशव येईल. पण तोही गेला असेल आज बायकोला, पोराला घेऊन चौपाटीवर भेळ खायला नाहीतर बसला असेल कुठल्यातरी थेटरात घाणेरडा सिनेमा पाहात.

रोग्याना भेटायला आलेल्या मंडळींचा कलकलाट वाढतो आहे. सगळ्या खाटांभोवती माणसानी गर्दी केली आहे. एखाद दुसरं लहान पोर मधेच उंच आवाजात किंचाळून आपल्याकडं लक्ष वेधून घेतं आहे. नर्स भिंगरीसारखी फिरतेय्. पेशंटला दटावतेय्. पेशंटकडे आलेल्या माणसाना दरडावून बोलतेय्. समोरच्या भिंतीवर पडलेला उन्हाचा कवडसा आता दिसेनासा झाला आहे.

विनायकराव पुन्हा डोळे मिटून घेतात. त्याना कुशीवर वळावेसे वाटते. पण कळ असह्य होते. कुशीवर वळण्याचा प्रयत्न ते सोडून देतात. डोळे उघडले नाहीत तरी त्याना वॉर्डच दिसत राहतो. वैतागून ते पुटपुटतात, “देवा, सोडव बाबा एकदा यातून. किती दिवस छळणार आहेस ?” आणि मग त्याना एकदम आठवते.... आपण देवबिव काही मानत नाही. सब झूठ है. मग खरं काय ? फक्त मरण आणि मरणाच्या वाटेवरची वेदना. कोणी सोडवू शकत नाही यातून. देव देखील. त्याला देखील मरावं लागतच. पण देव सुखानं मरतात. नुसता एखादा बाण लागून. आपल्याला सुखाचं मरणही येत नाही. आढयाकडं बघत महिनोन्महिने पडावं लागतं. साऱ्या अंगाला लागलेला ठणका सोशीत. . .

“काय ? कशी काय आहे तब्येत ? कालच्यापेक्षा आज बरी आहे ना ?” डॉक्टरांच्या प्रश्नानं विनायकराव भानावर येतात. हसतमुख तरुण डॉक्टर रोजचाच प्रश्न विचारतो आहे.

“कसली बरी डॉक्टर ? ठणका आहेच. कळ लागते. सहन होत नाही. डॉक्टर सोडवा मला यातून. असं औषध द्या की सारं संपेल. मग ठणका नाही. कळा नाहीत !”

“वा ! छान ! हे करण्यासाठी विद्या घेतली काय आम्ही ? बघा तुम्हाला दोन-तीन महिन्यात खडखडीत बरं करतो की नाही ते.”

“डॉक्टर, मी बरा होत नाही या आजारातून. मला माहीत आहे. तुम्हालाही माहीत आहे. तुम्ही आपलं मला बरं वाटावं म्हणून बोलता असं.”

डॉक्टर हसतात आणि म्हणतात, “काहीतरी समजूत करून घेतली आहे तुम्ही. तुमचा आजार मुळीच ‘सीरीयस्’ नाही. आता तुमचं वय झाल्यामुळं पुन्हा शक्ती यायला वेळ लागतो. तरुणीनाठी माणसं लवकर हिंडू फिरू लागतात. इथं पडून राहायचा तुम्हाला कंटाळा आला आहे म्हणून तुम्ही असं बोलता. पण आता फार दिवस नाही लागायचे. विचार करू नका फार. मी झोपेच्या गोळ्या देतो आहे. रात्री झोप येईनाशी झाली की पाण्याबरोबर घ्या. I am sure, tomorrow you will feel better.”

डॉक्टर निघून जातात. विनायकरावाना पुन्हा एकटं एकटं वाटतं. बाजूच्या कपाटावर डॉक्टरनी ठेवलेल्या दोन गोळ्यांकडं ते पाहतात. . . एक अख्खी बाटलीच ठेवली असती तर काय जात होतं ? सगळ्या गोळ्या खाऊन मरता आलं असतं. पण हे डॉक्टर लेकाचे चटकन् मरूही देत नाहीत. जीव वाचवू पाहतात. काय होतं अखेर ? माणूस जायच्या वेळी जातोच. औषधांची बिलं मात्र थकतात आणि ती भरता भरता पोरं मेटाकुटीला येतात. त्यांच्या बायकाना वाटतं, सासऱ्यासाठी पाण्यासारखा पैसा खर्च होतो त्यातून कसा छान फ्रीज घेता आला असता.

विनायकरावाना आठवतं, त्यांचं ऑपरेशन झाल्यावर त्यांची सून म्हणाली








होती, "काही नको स्पेशल रूम ! जनरल वॉर्डातच ठेवा म्हणावं. किती दिवस राहावं लागतंय् कोण जाणे ! जनरल वॉर्डात असलं म्हणजे चार माणसं शेजारी असतात. बोलायला तरी कुणी असतं. स्पेशल रूममध्ये ठेवलं तर कंटाळा येईल जास्त. डिलीव्हरीच्या वेळी आम्ही बायका स्पेशल रूममध्ये राहतो म्हणजे काय ? एकेक दिवस मोजतो. पण तेव्हा दहा दिवसांचाच प्रश्न असतो. इथं तसं नाही." केशवनं बायकोच्या म्हणण्यावर मान डोलावली होती. तो बायकोला दुजोरा देत म्हणाला होता, "दादा, तुम्ही जनरल वॉर्डातच रहा. म्हणजे कंटाळा नाही यायचा."

"आणि 'चार्ज'ही फार नाही पडायचा," सुनेकडं पहात विनायकरावांची बायको म्हणाली होती. सुनेनं सासूच्या बोलण्याकडं दुर्लक्ष केलं होतं.

. . . म्हणे स्पेशल रूममध्ये ठेवलं तर कंटाळा येतो. ठेवून तरी बघायचं होतं. सगळे लेकाचे एकजात अप्पलपोटे. पैसे खर्च करायला नकोत. बापानं कधी विचार केला होता का पैशाचा ? तेच चुकलं, तेच चुकलं. सगळी मिळकत यांच्या शिक्षणासाठी घालवली म्हणून आज असं यांच्या तोंडाकडं पाहायची वेळ येते आहे...

विनायकरावाना कळ असह्य होते. ते कण्हू लागतात.

. . . . .अजून कुणी आलं नाही. कुणी येईलसं दिसत नाही. पोरं तर फिरकतच नाहीत. निदान बायकोनं तरी यायचं. पण आता नाही ती यायची रोज. आपणच नाही का परवा सांगितलं तिला, "रोज येऊ नका" म्हणून. तिला तरी कुठं बरं आहे ? तोळामासा प्रकृती झालीय् तिची. जिना चढून आली तरी धाप लागते. आणि आली तरी तिच्याशी बोलायचं काय ? बोलायचं ते सगळं संपलय्. मुलांची बेपर्वाई आणि सुनेची अरेरावी कशी चालते हेच आता ऐकायचं की नाही ?. . . . . . . .पण या केशवला काय झालं ? एवढा कसा वाईलवृद्ध्या झाला हा ?.....

विनायकराव पुन्हा एकवार डोळे मिटून सगळं दृष्टीआड करू पाहतात. वॉर्डमधल्या ध्वनीक्षेपकाकडून सूचना येऊ लागते, "डॉ. दास, कृपा करून फीमेल वॉर्डमध्ये या. डॉ. दास प्लीज....."

विनायकराव डोळे उघडतात तेव्हा त्यांच्या खाटेपाशी एक तरुण उभा असतो. त्याच्या हातात एक जाडजूड पुस्तक आहे.

. . . याला कुठं बरं पाहिला आहे ? हा चांगल्या माहितीचा आहे आपल्या. पण कोण हा ? नाव काय याचं ?. .

"आता कशी काय आहे आपली प्रकृती ?"

विनायकराव काहीच बोलत नाहीत. ते डोळे किलकिले करून त्याच्याकडं पाहतात. आपली ओळख पटलेली नाही हे त्या तरुणाच्या लक्षात येतं. काहीसं अवघडून तो विचारतो, "आपण ओळखलेलं दिसत नाही मला. मी अनंत आगाशे. केशवचा मित्र."

. . . .हां, हां, अनंत आगाशेच हा. अंगानं चांगलाच सुटलेला दिसतो अलीकडे. म्हणून ओळखता आला नाही. पण याला ओळखायला हवं होतं आपण. घटस्फोट घ्यायला निघालेल्या केशवचा मोडणारा संसार सावरला आपण तो याच्याच मदतीनं. त्यावेळी कितीदा आपण याची भेट घेतली. याचा पिच्छा पुरवला. आपल्या व त्याच्या सारख्या होणाऱ्या भेटींचा, चर्चेचा पत्ता लावू न देता केशवची समजूत घालण्यासाठी याला गळ घातली. केशवचा याच्यावर आपल्यापेक्षा जास्त विश्वास. त्यानंही वर्ष दीड वर्ष आपल्या सांगण्यावरून केशवचं मन वळवण्याचा प्रयत्न केला. केशवचा संसार विस्कटला नाही. तडा गेलेली मनं सांधली गेली अखेर! पण आज हा अचानक कसा आला इथं ?

विनायकराव त्याचा हात आपल्या थरथरत्या हातात घेतात आणि म्हणतात, "आगाशे, I am dying". त्यांचा घसा दाटून येतो.

आगाशेला काय बोलावं काही समजत नाही. आपला हात त्यांच्या हातातून सोडवून घेत तो खाटेशेजारच्या स्टूलावर बसतो आणि हातरुमालानं घाम पुशीत राहतो. विनायकराव त्याच्याकडे पाहात राहतात.

"केशव येऊन गेला का आज ?"

"नाही. आज कुणीच आलं नाही; आता कुणी येईल असं वाटत नाही.

"पण केशव तर रोज येतो ना ?"

"रोज नाही येत. पण बहुधा येतो संध्याकाळी ऑफीस सुटल्यावर. आज रविवार. . . "

"हं. म्हणूनच आज फोनवर केशवशी बोलता आलं नाही. खरं म्हणजे मी त्याच्याबरोबरच येणार होतो. तसं आमचं ठरलं होतं. कामांच्या गर्दीत आपल्याकडं यायला वेळच झाला नाही. आज जाऊ, उद्या जाऊ. करता करता राहूनच गेलं. तुमच्या घरी दोन तीनदा डोकावलो होतो. भास्करनं सांगितलं होतं ऑपरेशन झाल्यावर. शिवाय केशवही एकदा भेटला होता. तुम्हाला अजून घरी पाठवायला डॉक्टर तयार नाहीत असं म्हणत होता. पण म्हणाला, आता तुमची प्रकृती बरी आहे."

"बरी कसली आली आहे आगाशे ? झिजून झिजून मरतो आहे. मला कंटाळा आला आहे जगण्याचा."

आगाशेला आणखी अवघडल्यासारखं होतं. आपण एकटे उगाच आलो. केशवबरोबर यायला पाहिजे होतं असं त्याला वाटतं. काहीतरी बोलायचं म्हणून तो म्हणतो, "छे, छे, असं म्हणू नका. थोड्याच दिवसात बरे व्हाल तुम्ही."

"आगाशे, बरं होऊन काय करू ? जगण्यात काही अर्थ राहिला नाही आता."

"असं कसं म्हणता आपण ? अजून भास्करचं लग्न व्हायचं आहे, नारायणचं व्हायचं आहे, वामनचं व्हायचं आहे."

"ती होतील आगाशे. पोरं आपापली लग्न जमवतील. आमच्याविना थोडंच अडायचं आहे ? आमचा झालाच तर अडथळाच होणार."

"असं कुठं झालंय् काय ? घरात वडीलधाऱ्या माणसाचा केवढा आधार वाटतो."

"आधार नाही वाटत आगाशे, अडगळ वाटते. तुम्हाला वडील नाहीत म्हणून. . ."

विनायकराव एकदम थांबतात. आगाशेला वडील नसल्याचा उल्लेख यायला नको होता आपल्या तोंडून असं त्याना वाटतं. ते अपराधी मुद्रेनं आगाशेकडं पाहतात. आगाशे दुसरीकडं पहातो आहे. काही क्षण कुणीच कोणाशी बोलत नाही. आगाशे चष्म्याच्या काचा रुमालानं पुसतो आहे. आपले वडील हयात नसल्याचा उल्लेख विनायकरावानी करायला नको होता असं त्याला वाटतं. क्षणभर आपण तिथून निघून जावं असं त्याला वाटतं. पण मग तसं करण्यानं विनायकरावाना उगीचच वाईट वाटेल असं त्याच्या लक्षात येतं. विषय बदलायचा म्हणून तो म्हणतो,

"केशवचा छोकरा चांगलाच दंगेखोर झाला आहे नाही ? आवरता आवरत नाही. सारखा मस्ती करतो आणि बडबडही करीत असतो."



ग्रामीणिका

इनंती—

**तुझ्या पदराआडचं पारवं**
**फोडत्यात माजं डोळं हिरवं**
**आन् चाळवत्यात माझी नदर**
**म्हनून म्हंतो, बये, सावर तुजा पदर !**

"असं का ? मी नाही पाहिला अलीकडे." विनायकराव तिऱ्हाइतासारखं म्हणतात.

"म्हणजे ? वहिनी आल्या नाहीत का इकडं दिलीपला घेऊन ?"

"नाही. गेल्या दोन महिन्यात नाही आली. त्या आधी पाहिला होता त्याला ओझरता. उभ्या उभ्या येऊन गेली. मुलगा बसू देत नाही म्हणून लवकर निघून गेली."

विषय पुन्हा पूर्वपदावर येतो आहे. आगाशेला काही सुचत नाही. एवढ्यात नर्स येते आणि विनायकरावांच्या काखेत थर्मामिटर लावून पाहते. विनायकरावांच्या चिडलेल्या, त्रासलेल्या चेहऱ्याकडं आगाशे पाहात राहतो. त्यांच्या छातीच्या फासळ्या दिसताहेत. कपाळावर आठ्यांचं जाळं आहे. क्षणभर आगाशेला वाटतं, "आपणही असेच पडणार कधीतरी कुठल्यातरी इस्पितळातल्या खाटेवर ! कुणी विचारपूस करायलाही यायचं नाही. झिजून झिजून असंच मरायचं. माणसाची जात किती कृतघ्न आहे याचा साक्षात्कार झाल्यानंतर! आगाशे बेचैन होतो. आपण उगाचच आलो असं त्याला वाटायला लागतं.

. . . .आपण आलो नसतो तरी चाललं असतं. या माणसाच्या नात्याची माणसं जियं फिकीर करीत नाहीत तिथं आपण कोण ?. . .

आणखी काही वेळ संभाषण चालू ठेवावं म्हणून आगाशे विनायकरावाना विचारतो,







अनुक्रमणिका

"काही वाचायची परवानगी आहे की नाही ? असेल तर एक नवी सुरेख कादंबरी पाठवून देतो. वेळ जाईल तुमचा."

"कादंबरी ? आगाशे, गेल्या दोन महिन्यात एक अक्षर वाचलं नाही. आणि वाचायचं तरी कशाला ? इतके दिवस सारखं वाचण्यात आयुष्य घालवलं. काय मिळालं ? नुसते शब्द. नुसते शब्द. तुम्ही अजून लहान आहात. तुमचं ठीक आहे. पण तुम्हाला राग येणार नसेल तर सांगतो. आपण हे सगळं वाचतो ना ते सारं खोटं असतं. खरं असतं एकच–हे मरणाची वाट पाहात राहाणं. आगाशे, खरं सागतो तुम्हाला, I am dying"

विनायकरावाशी बोलायला आगाशेजवळ विषयच नसतात. तो काही वेळ स्वस्थ बसून राहतो. आता निघायला हरकत नाही असं त्याला वाटतं. घड्याळाकडं पाहात तो म्हणतो, "सात वाजायला आलेच. आता दिवस मोठा असतो आणि रात्र लहान असते ना म्हणून सात वाजायला आले तरी काळोख नसतो झालेला. सात वाजल्यानंतर इथं पेशंटला भेटायला येणाऱ्याना वसू देत नाहीत ना ? बरंय्, मी येतो आता."

आगाशे हात जोडून विनायकरावाना नमस्कार करतो. तो उठलेला पाहून त्याना वाईट वाटतं. आपण त्याच्याशी उगाच एवढं कडवट बोललो असं त्याना वाटतं. ते त्याच्याकडे पाहून हात जोडीत म्हणतात,

"आगाशे, मला माफ करा. मी तुमच्याशी बोलण्याच्या स्थितीत नाही. गैरसमज करून घेऊ नका."

"छे, छे, गैरसमज कसला. मीच उगीच आपल्याला एवढं बोलायला लावलं. आपल्याला थकवा आला आहे. आपण झोपा आता स्वस्थ. मी येईन पुन्हा कधीतरी असाच." असं म्हणून आगाशे झपाझप चालत वॉर्डबाहेर पडतो.

". . . हा म्हणाला आहे खरा पुन्हा येईन म्हणून, पण आता नाही यायचा. आताच त्याला कधी एकदा आपण इथून बाहेर पडू असं झालं असेल. म्हणूनच तो घाईघाईनं निघून गेला...." विनायकराव तो गेला त्या दिशेकडे पाहात राहतात.

वॉर्डमध्ये दिवे लागतात. दिव्याचा भगभगीत प्रकाश विनायकरावाना सहन होत नाही. ते डोळे मिटून घेतात. नर्सचा कर्कश, खरखरीत आवाज वॉर्डभर घुमतो, "टाईम खतम हो गया. चलो. जल्दीसे वॉर्ड खाली करो. जल्दीसे वॉर्ड खाली करो..."

---

[२]

# मोगूबाई कुर्डीकर



**अल्लादियाखाँसाहेबांकडून मोगूबाईंनी जी विद्या मोठ्या कष्टाने मिळवली ती तितक्याच निष्ठेने जतन केली....इतरांनाहि मुक्त हस्ताने दिली. पैसा मिळ-वण्यासाठी गानसाधनेत खंड पडू लागला की गाणे खुरटते असे बाईंना वाटते. म्हणूनच काळाशी तडजोड करणं त्यांनी कटाक्षाने टाळले. त्या दृष्टीने मोगूबाईंचे स्वप्न आज निश्चितच साकार झालेले आहे. अशा या महान् कलावंताचे मर्मज्ञ रसिकाने रेखाटलेले हे हृद्य चित्रण—**

जवळ जवळ दहावारा वर्षापूर्वी घडलेला एक प्रसंग. मुंबईत त्यावेळी एक नृत्य-संगीत महोत्सव साजरा होत होता. शेकडो श्रोते पदरमोड करून येत होते. पण कां कोण जाणे पहिल्या दिवसापासूनच श्रोत्यांचे व कलावंतांचे बिनसले होते. आपली नाखुशी व्यक्त करण्यासाठी श्रोते हुल्लड माजवीत होते. एका रात्री तर कहर झाला होता. एका सुशिक्षित गुणी नर्तकीवर कागदी बाणांचा, फळांच्या सालींचा श्रोत्यांनी वर्षाव केला होता. रंगमंचाच्या दिशेने कोणत्याही क्षणी काय काय भिरकावले जाईल याचा नेम नसल्याने महोत्सवात नंतर गाणाऱ्या कलावंतांनी धास्ती घेतली होती. हा सोहळा कसा पार पडतो या चिंतेने संयोजक अस्वस्थ झालेले. अशा परिस्थितीत एका मातबर कलावंताने ऐनवेळी प्रकृती अस्वास्थ्याचे कारण सांगून आपण ठरलेल्या वेळी गाऊ शकणार नाही असे कळवले. आधीच चिडलेल्या श्रोत्याना ही बातमी सांगि-तल्यावर चेकाळलेले श्रोते काय करतील याचा नेम नव्हता. त्या मातबर कला-वंताऐवजी आयत्या वेळी येऊन वेळ साजरी करणाऱ्या कलावंतालाही भडकलेल्या श्रोत्यांकडून त्रास दिला जाण्याचा धोका होता. त्यामुळे ऐनवेळी गाण्याची जोखीम पत्करायलाही कोणी कलावंत तयार

अनुक्रमणिका

नव्हता. या आपत्तीतून सुटका व्हावी म्हणून संयोजकानी श्रीमती मोगूबाई कुर्डीकराना वेळ साजरी करण्याची विनंती केली. मोगूबाई त्या महोत्सवात गाणार होत्याच; पण त्यांचा कार्यक्रम होता महोत्सवाच्या अखेरच्या दिवसात. संयोजकांची विनंती मोगूबाईंनी मानली. आणि त्या या अग्निदिव्यास तयार झाल्या. त्यांच्या नेहमीच्या तबलजीने त्याना साथ करायला नकार दिला. चिडलेले श्रोते आपली अप्रतिष्ठा करतील असे त्याला वाटत होते. मोगूबाईंनीही हे साहस करू नये असे त्याचे प्रामाणिक मत होते. पण मोगूबाईंनी ते मनावर घेतले नाही. दुसरा तबलजी त्यानी साथीला घेतला आणि ज्या मातबर कलावंताने ऐनवेळी प्रकृती अस्वास्थ्याचे कारण देऊन संयोजकाना पेचात पकडले त्यांच्या उपस्थितीतच रुष्ट श्रोत्याना मोगूबाईंनी जिंकले. शेकडो श्रोत्यांचे कान निवले आणि तृप्त श्रोत्यानी मुक्त-कंठाने दाद दिली. संगीत-महोत्सवात कलावंतांची आणि श्रोत्यांची कुंडली जमली आणि नंतरचे कार्यक्रम सुरळीत पार पडले.

आज वयाची साठी ओलांडलेल्या मोगूबाईना आपल्या ज्या मोजक्या मैफली आठवतात; त्यातली ही एक अपूर्व मैफल. असे कसोटीचे प्रसंग मोगूबाईंच्या आयुष्यात कितीतरी आले. त्या त्या वेळी त्यांची कला कसाला लागली आणि तावून सुलाखून निघाली. चौदा कॅरटच्या संगीताच्या युगात आपण राहात आहोत. त्यामुळे अस्सल सोने नजरेलाही पडत नाही. अलीकडे मोगूबाईंचे गाणे जाहीर बैठकीत क्वचितच ऐकायला मिळत असले, तरी त्यांच्या ऐन उमेदीच्या काळात त्यानी संगीत-परिषदा गाजवल्या आहेत. खाजगी बैठकी रंगवल्या आहेत. कितीतरी वर्षे आकाशवाणीच्या असंख्य श्रोत्यांना रिझवले आहे. त्या काळातले त्यांचे गाणे थोड्या ध्वनिमुद्रिकांच्या रूपाने उरले आहे तेवढेच. पण गाणे 'टेप' करून घेण्याच्या आज उपलब्ध असलेल्या सोयी त्या काळात फारशा उपलब्ध नसल्याने आणि "–'टेप' रूपे आपण उरावे" असे कलावंतालाही वाटत नसल्याने कितीरी महान् गायक-गायिकांचे गाणे काळाच्या ओघात वाहून गेले. आता राहिल्या आहेत त्या फक्त त्या काळात त्यांचे गाणे ऐकायला मिळालेल्या नशीबवान श्रोत्यांच्या आठवणी. मोगूबाईचे सूरही असेच वाऱ्यावर विरून गेले. खुद्द मोगूबाईनाही आपल्या फार थोड्या मैफलींची आठवण आहे. खरे म्हणजे आपल्या मैफलींबद्दल किंवा एकूण आपल्या पूर्वायुष्याबद्दल जेव्हा त्या बोलतात तेव्हा ऐकणाऱ्याला सारखे वाटते, प्रतिकूल परिस्थितीने दिलेले आव्हान संधी समजून स्वीकारायचे अशी मोगूबाईची रीत दिसते. आजही त्याना पूर्वायुष्यातील घटना किंवा मैफली आठवतात त्याही बहुधा याच प्रकारच्या !

## सुखाचा शोध? नव्हे–सुरांचा ! नव्हे नव्हे–सुखाचाच !

त्यातली अगदी पहिली आठवण : अंथरुणाला खिळलेली आई मृत्युशय्येवर अखेरच्या घटका मोजीत असलेली. मोगूबाईचे वय त्या वेळी जेमतेम सात-आठ वर्षांचे. त्या खेळात गुंग झालेल्या. त्यांच्या घराभोवती घिरट्या घालणाऱ्या, दरवाजा ठोठावणाऱ्या मृत्यूचे त्याना भान नव्हते. अचानक कुणी तरी त्याना बोलावते. आई मुलीची आठवण काढते आहे. डोळे भरून मुलीला एकदा पाहून घेण्याची इच्छा आहे. आईचा जीव घुटमळतो. आई आपली आकांक्षा बोलून दाखवते. "मोगू, मला तुला गाणं शिकवायचं होतं. पण आता नाही जमणार. तू गाणं शीक. मोठी हो." आईने मुलीकडून वचन घेतले आणि डोळे मिटले. मोगूबाईचे बालपणही त्याच क्षणी संपले. लहान वयात मोठ्या कुटुंबाचा भार उचलीत सुरांचा शोध सुरू झाला.

पोटासाठी भ्रमंती करीत मोगूबाई सांगलीस आल्या. मिळतील तेवढे सूर साठवीत. कणाकणाने संगीत विद्या मिळवीत. जात्या गोड असलेल्या गळ्यावर संस्कार थोडेसे झालेले. सारखं गुणगुणत राहण्याची संवय. कधी सुरांच्या त्याच धुंदीत मोकळेपणाने मोठ्याने गात असत. नाटकातील लोकप्रिय पदे म्हणण्याचा तेव्हा नाद. "माडीवरी चल ग गडे" हे त्यावेळचे एक लोकप्रिय पद मोगूबाई गुणगुणत, नकळत मोठ्याने म्हणत. कुणीतरी रोज आपल्या घरापाशी रेंगाळत आपले हे गाणे ऐकते आहे, याची त्याना कल्पना नव्हती. एक दिवस त्या व्यक्तीला राहवत नाही. ती व्यक्ति सरळ घरात शिरते आणि थेट मोगूबाईच्या समोर उभी राहते. मोगूबाई भानावर येतात. गाणे अर्धेच राहते. मोगूबाईचा आपल्या डोळ्यावर विश्वास बसत नाही. त्या गोंधळून जातात. हसत हसत पाहुणे म्हणतात, "गा बेटा, गा. मला तुझं गाणं ऐकायचं आहे. रोज मी बाहेर उभा राहून ऐकतो. आज राहवलं नाही. आत आलो." मोगूबाईना नवल वाटते. खांसाहेब अल्लादियाखांसारख्या गायकाने आपले गाणे रोज असे ऐकावे? मोगूबाईंनी सांगलीच्या आबासाहेब सांबारे वैद्यांच्याकडे औषधोपचारासाठी आलेल्या अल्लादियाखांना पाहिलेले असते. मोगूबाईचे गाणे ऐकून खूप झालेले खांसाहेब आपण होऊन गाणे शिकविण्यास तयार होतात.

## कसोटीची प्राचीन परंपरा

आज अल्लादियाखांसाहेबांच्या विषयी बोलताना मोगूबाईच्या शब्दात अपार










कृतज्ञता दिसते आणि असीम आदर दिसतो. खांसाहेबांचा अनुग्रह जरी असा सहजासहजी झाला, तरी त्यांच्याकडून विद्या सहज मिळाली असे नाही. एकतर तालीम देण्याची खांसाहेबांची रीत विलक्षण! पाच पंचवीस रागांचा रतीब वर्षा दोन वर्षांत घालणाऱ्या संगीत शिक्षकांच्या आजच्या युगात खांसाहेबांचे तंत्र विचित्र वाटण्याचाच जास्त संभव. एकेक राग महिनोन् महिने घटवून घ्यायचा. सूर असे वर्षानुवर्षे पिसायचे हा खांसाहेबांचा शिरस्ता. त्यामुळे उर फुटेतो मेहनत करायची आणि चिवटपणाने, चिकाटीने विद्या घ्यायची एवढे शिष्याला निर्धाराने करावे लागे. शिवाय अल्लादियां खांसाहेबांच्या घराण्याची गायकी ही मोठी तेढी, पेचदार. ती सहजासहजी गळचावर चढणे दुर्घट. त्या गायकीचे वळणच नागमोडी. असली गायकी आत्मसात् करण्याचा ध्यास मोगूबाईंनी घेतला. कष्टांची त्याना फिकीर नव्हती. तरीही या ना त्या कारणाने तालीम मिळण्यात विघ्ने यायची. कधी परिस्थितीमुळे तर कधी आवतीभोवतीच्या माणसांमुळे! तालमीत खंड पडायचा. मोगूबाईंना रुखरुख वाटायची. विघ्ने आणणाऱ्या माणसांचा संताप यायचा. गुरुचे स्मरण करीत तोवर मिळालेल्या रागिण्यांचा रियाज मात्र चालू राहायचा. पुन्हा कधीतरी खांसाहेब यायचे. कुबेराचे भांडार उघडले जायचे. त्यांतच एकेक नग पाहता पाहता मोगूबाई हरखून जायच्या. खांसाहेब जेव्हा जेव्हा शिकवतील आणि जेथे जेथे शिकवतील तेथे तेथे शिकायची म्हणून मोगूबाईची तयारी होतीच. खांसाहेब कोल्हापूर सोडून मुंबईस राहण्यासाठी जाणार होते. मोगूबाईंना त्यामुळे मुंबईस येणे भाग होते. मोगूबाई मुंबईस आल्या आणि खेतवाडीत कोल्हापूरच्या महाराजांच्या वाड्यात राहणाऱ्या अल्लादियाखांच्याकडे तालीम घेऊ लागल्या.

मोगूबाईंनी संगीताची साधना केली ती अशा खडतर परिस्थितीत. कुटुंबाच भार उचलण्यासाठी त्या लहानपणी नाटकात कामेही करीत. सातारच्या अंबूबाई नावाच्या स्त्रीने चालवलेल्या नाटक कंपनीत त्या काही दिवस होत्या. नाटक कंपनीत होत्या सगळ्या स्त्रियाच. नाटकात पुरुष-पात्रांची कामे काही स्त्रिया करीत. मोगूबाईही कधीकधी 'पुरुषपार्ट' करीत. नाटकातल्या समरप्रसंगात तलवारीचे वार झेलीत सामना देत आपल्या त्यावेळच्या अभिनयाच्या आठवणीने मोगूबाई खळखळून हसतात. नाटकमंडळी बरोबरच्या भ्रमंतीत मोगूबाईंना मोठे विलक्षण अनुभव आले. मन मानेल त्याप्रमाणे कारभार करणाऱ्या लहरी संस्थानिकांचा तो काळ. इतर सगळ्या षोकाप्रमाणे नाटके पाहण्याचा या राजे महाराजाना षोक असायचा. नाटककंपनीतल्या एखाद्या नटावर राजेसाहेबांची मेहेरनजर झाली तर जन्मभर

आश्रित बनून राजाचे मनोरंजन करीत राहावे लागायचे. अशाच एका राजेसाहेबांना मोगूबाईंची छोटीशी भूमिका आवडली. श्रीमंतांचे बोलावणे या मुलीला येणार हे कंपनीच्या मालकिणीने ओळखले आणि विगमध्ये आलेल्या मोगूबाईना काय होते आणि काय नाही हे कळायच्या आत तिने मोठ्या शिताफीने एकादोघा विश्वासू माणसाकरवी मोगूबाईंची सातारला रवानगी केली. नाटकाचा प्रयोग पहाण्यात महाराज रंगलेले होते. नाटक संपल्यानंतर मुलीला शोधण्याचा वहाणा करीत मालकीणबाईही निसटल्या. त्या माऊलीची आठवण मोगूबाईना आजही आहे.

### अवघडवणारा नमस्कार

मोगूबाईना असे अनुभवही फार लहान वयात आले. पण त्या कडवट किंवा विलक्षण अनुभवांच्याच आठवणी सांगतात असे नाही. काही गोड आठवणीही त्यानी जपून ठेवल्या आहेत. त्यापैकी एका मैफलीची आठवण त्यांच्या मनात फार ताजी आहे. एका मैफलीत मोगूबाई कसून गात होत्या. त्यांचे सूर अल्लादियाखांसाहेबांच्या वैभवाची साक्ष देत होते. त्या गर्भश्रीमंत गाण्याने श्रोते दिपून गेले होते. त्यादिवशी श्रोत्यांमध्ये बालगंधर्व होते. मोगूबाईंचे गाणे संपले तेव्हा बालगंधर्वांनी त्यांना वंदन केले. आपल्यापेक्षा वयाने मोठ्या असलेल्या बालगंधर्वांनी नमस्कार केलेला पाहून मोगूबाईना अवघडल्यासारखे झाले. तो उमदा कलावंत मात्र म्हणाला, "त्यात काही चुकलं नाही. हा नमस्कार आहे तो माझ्या गुरुंच्या गुरुला. खांसाहेबांची गायकी आज तुमच्या रूपानं दिसली." आयुष्यात भोगलेल्या साऱ्या कष्टांचा विसर पडावा असेही काही क्षण मोगूबाईनी अनुभवले आहेत. त्यापैकी हा एक.

समकालीनापैकी फार थोड्यांचे गाणे त्यानी ऐकले. जे थोडेसे ऐकले त्यातली मंजीखांसाहेबांच्या एका मैफलीची स्मृती अजून त्यांच्या मनात घर करून आहे. अल्लादियाखांसाहेबांच्याच आणखी एक शिष्या कै. लक्ष्मीबाई जाधव यांच्या विषयीही मोगूबाई फार जिव्हाळ्याने व आदराने बोलतात. अलीकडेच लक्ष्मीबाई जाधवांच्या पुण्यतिथीनिमित्त त्या मुद्दाम कोल्हापूरला जाऊन गायल्या. भास्करबुवा बखल्यांची पुण्यतिथी नुकतीच 'ट्रिनीटी क्लबने' साजरी केली तेव्हाही त्यानी हजेरी लावली. खरे म्हणजे मोगूबाईंचे गाणे अलीकडेच ऐकायला मिळते ते अशाच काही निमित्ताने. वार्धक्याची सावली आता त्यांच्या गाण्यावर पडलेली आहे. सुरुवाती सुरुवातीला स्वर कापतो, थरथरतो—पण काही क्षणातच हा स्वर टवटवीत होतो. पर्वणी समजून गाणे ऐकायला आलेल्या जाणत्या, दर्दी श्रोत्यानाही बुचकळ्यात पाडणारा एखादा अनवट राग मग मोगूबाई आळवतात. राग ओळखीचा वाटतो, पण तरीही लक्षात येत नाही. नक्की कोणता ते सांगता येत नाही. गाणे संपल्यावर कुणाकडून तरी कळते, "हा बसंती कानडा! हा आधीचा बागेश्री बहार !" मोगूबाई मिस्किलपणे हसतात. आपल्याला वाटते, "बाई जास्त कां गात नाहीत? त्यानी वारंवार गायला हवे." तुम्ही असे त्याना सांगण्याचे साहस केलेच तर त्या फक्त हसतील आणि मग सांगतील, "अहो, आता कसलं आमचं गाणं? आता पूर्वीसारखं जमत नाही. माझ्या जुन्या रेकॉर्डस् ऐकायला मिळाल्या कुठे तर ऐका. त्यात आहे थोडंसं ते गाणं."

### सगळे बदलले तरी...

आपले गाणे आता पूर्वीसारखे राहिले नाही याची जशी मोगूबाईना जाणीव आहे तसा आजचा जमानाही पूर्वीसारखा राहिलेला नाही याचीहि त्याना कल्पना आहे. एके काळी धनिकांच्या प्रासादात कोंडलेले गाणे आता उघड्यावर आले आहे. बंदिस्त दिवाणखान्यातल्या मूठभर माणसापुरते मर्यादित असलेले गाणे आता आलीशान सभागृहातल्या शेकडो श्रोत्यांच्या समोर होत असते. गाणे बजावणे ऐकण्याचा षोक एके काळी फारसा चांगला समजला जात नव्हता. त्या षोकाचे प्रदर्शन आता प्रतिष्ठीत माणसे बिनदिक्कत करीत आहेत. कलावंताची प्रतिष्ठा वाढली आहे. त्याला मानसन्मान मिळतो. सत्कार समारंभ होतात. भरपूर बिदागी मिळते. देशात, परदेशात त्याचे कार्यक्रम होतात. एखाद्या गुणी कलावंताला आता मान्यताही पूर्वीच्या मानाने लवकर व सहज मिळते. वृत्तपत्रे, आकाशवाणी, चित्रपट, वगैरेमुळे कलावंतावर प्रकाशाचा झोत सारखा पडत असतो. मोगूबाईंच्या डोळ्यादेखत हे बदल झाले. ते सारे अटळ होते याची त्याना कल्पना आहे. या नव्या परिस्थितीत कलावंताला तडजोडही करावी लागते. मैफल ऐकण्यास येणाऱ्या श्रोत्यांचा वकूब लक्षात घेऊन मग पहिल्यांदा एक बडा ख्याल, मग ठुमरी, एखादं नाटकातलं पद नाहीतर भावगीत, पुन्हा एखादा ख्याल आणि मग ठुमरी किंवा भजन असा मैफलीचा लोकप्रिय साचा स्वीकारावा लागतो. वेळेचे अवधान ठेवावे लागते. तीन—साडेतीन तासात माप टाकावे लागते. श्रोत्यानी फर्माईश केली की, मग ठराविक वेळेला विशिष्ट राग गायचे हे बंधन झुगारून द्यावे लागते. गर्दीला मानवेल एवढेच माफक गावे लागते. आणि मैफल रंगवण्याचे शास्त्र सांभाळावे लागते. आजच्या परिस्थितीत हे सारे अटळ आहे हे मोगूबाईना माहीत आहे. असे असूनही त्यानी या बदलत्या परिस्थितीशी जुळवून घेण्यासाठी तडजोड केलेली दिसत नाही. ठुमरी किंवा भजने म्हणण्याचा मोह कटाक्षाने टाळला. ख्याल गायकीलाच त्या चिकटून राहिल्या. केवळ श्रोत्यांच्या अनुनयासाठी आपल्या मैफलीचे रूप त्यानी कधी बदलले नाही.

### सोन्याला सुगंध....

अल्लादियाखांसाहेबांच्याकडून कष्टाने जी विद्या मिळाली ती मोगूबाईंनी निष्ठेने जतन केली. एवढेच नव्हे तर विद्या दिल्याने वाढते असे मानून अनेकाना तालीम दिली. आजही त्या शिकवीत असतात. त्यांच्या घराण्याची मुश्किल गायकी शिकण्याची कुणी इच्छा व्यक्त केली तर आपल्याजवळची विद्या द्यायला मोगूबाईनी कधी खळखळ केली नाही. कारण गाणे अखेर टिकते ते आपल्याला जे येते ते दुसऱ्याला मुक्तहस्ताने देण्यामुळे! मोगूबाईनी आपली विद्या मुलीला जशी दिली तशी इतरानाही दिली. आपल्या कन्येच्या —सौ. किशोरी आमोणकरांच्या—संगीत क्षेत्रातील वाढत्या यशाचे त्याना कौतुक वाटते. खरे म्हणजे ही प्रतिभाशाली तरुण गायिका ही मोगूबाईनी भारतीय संगीताला दिलेली






मोठी देणगी आहे. सोन्याला सुगंध यावा तसे झाले आहे. बदलत्या काळाशी ज्या तऱ्हेने आपली मुलगी समरस होऊ पाहते आहे ती तऱ्हा मोगूबाईना सर्वस्वी पसंत आहे असे नाही. पण तरीहि आपल्या मुलीच्या पिढीच्या वाटचाला आलेल्या परिस्थितीतील अपरिहार्यता त्या समजू शकतात. त्याना एवढेच वाटते की, गायकाच्या साधनेत त्यामुळे खंड पडू नये. गाण्याच्या सकाळ–संध्याकाळ शिकवण्या किंवा अनेक बैठका यानी पैसा मिळाला तरी त्यामुळे विद्या मिळविण्यासाठी आवश्यक ती सवड न मिळण्याचा धोका असतो. मग अशा माणसांचे गाणे खुरटते. मागणी-बरहुकूम पुरवठा तेवढा होत राहतो. मोगूबाई या मोहापासून आपल्या शिष्यांना परावृत्त करण्याचा सारखा प्रयत्न करीत असतात.

स्वतः मोगूबाईनी काळाशी अशी तडजोड केली नाही. ते बरोबर की चूक याबद्दल दुमत होऊ शकेल. पण तडजोड करण्यामुळे होणारे व्यावहारिक फायदे दिसत असताही तडजोड करायला नकार देणे ही वाटते तेवढी सोपी गोष्ट नाही. अलीकडे मोगूबाईंच्या जाहीर बैठकी फारशा होत नाहीत. त्याचे कदाचित् हे एक कारण असेल. स्वातंत्र्योत्तर कालात कलावंतांचा मानसन्मान करण्याची प्रथा पडली. मोगूबाईंच्या समकालीनांचा सरकारने गौरव केला. त्यांच्यापेक्षा वयाने लहान असलेल्यांचीही सरकार दरबारी दखल घेतली गेली. पण कां कोण जाणे मोगूबाईंच्या वाट्याला हे मानसन्मान, पारितोषिके आली नाहीत. तरीहि आपल्या गुणांची कदर केली गेली नाही याचा विषाद त्यांच्या बोलण्यात प्रतिबिंबीत होत नाही; कुठे कडवटपणाचा सूर उमटत नाही.

कदाचित् आपली परंपरा चालवण्याचे सामर्थ्य असलेल्या कन्येच्या रूपाने दैवाने आपल्याला मोठे पारितोषिक दिले आहे असे त्याना वाटत असावे !

●●●

[३] तरुण नाटककारांनी काबीज केलेल्या आजच्या आंग्ल नाट्यसृष्टीचा सम्राट—

# जॉन ऑसबर्न



इंग्लंडमधील आजची रंगभूमी वयाने तीस–पसतीसच्या आतबाहेर असलेल्या तरुण नाटककारानी काबीज केली आहे. गेल्या दहा वर्षात नव्या पिढीच्या काही नाटककाराना मिळालेले व्यावसायिक यश दृष्ट लागण्यासारखे आहे. वस्तुतः चित्रपट—विशेषतः दूरचित्रवाणी यांच्या स्पर्धेमुळे नाटकाचा धंदा तसा 'तेजीत' नाही. सर्वसामान्य इंग्रज माणूस नाटकवेडा असला तरी त्यामुळे परगण्यातील नाट्यगृहे वारमहा भरलेली असतात असे समजण्याचे कारण नाही. नाहीतर या नाट्यगृहांपैकी काहीचा वखारी म्हणून उपयोग करणे किफायतशीर ठरेल की काय याचा विचार केला जात असल्याचे सांगितले गेले नसते. कशीबशी स्वखर्चाची तोंडमिळवणी करता करता मेटाकुटीस आलेल्या नाटकमंडळ्या परगण्यात दौऱ्यावर दिसतात त्या संचालकांच्या जिद्दीमुळे! अशा परिस्थितीत नवशिक्या नाटककाराचे नव्या वळणाने लिहिलेले नाटक सादर करण्याची जोखीम पत्करावयास नाटकमंडळ्या तयार झाल्या नसत्या तर ते समजण्यासारखे होते. असे असूनही गेल्या दहा वर्षात कितीतरी नवे नाटककार प्रेक्षकाना माहीत झाले. आजच्या इंग्रजी रंगभूमीवर नाटकांचे उदंड पीक येत असलेले दिसत आहे. 'आर्ट कौन्सिल'-सारख्या संस्थेमार्फत युद्धोत्तर काळात सरकारी मदतीचा ओघ रंगभूमीकडे वाहू लागला आणि आर्थिक पाठबळाच्या जोरावर काही नाटकमंडळ्या नवी नाटके सादर करण्याचे साहस करूनही तग धरू











शकल्या. नव्या नाटककारांची सगळीच नवी नाटके रंगभूमीवर गाजली किंवा गल्लाभरू ठरली असे नाही. बरीच नवी नाटके पडली पण काही नाटकानी मात्र सर्वसामान्य प्रेक्षकांचीही मने जिंकली. या यशस्वी नाटकानी मिळवून दिलेल्या पैशामुळे अपेशी ठरलेल्या नाट्यकृतीही नाटकमंडळीला बुडवू शकल्या नाहीत.

## अभूतपूर्व यश

जॉन ऑसबर्न हे गेल्या दहा वर्षातले सर्वात 'यशस्वी' नवे नाटककार. रॉयल कोर्ट या नाट्यगृहास १९५६ ते १९६२ या सहा वर्षाच्या काळात एक लाख पौंडाहून अधिक उत्पन्न मिळाले. त्यातील अर्ध्याहून अधिक रक्कम फक्त ऑसबर्नच्या नाटकांच्या प्रयोगापासून मिळाली. नव्या नाटककारांपैकी दुसऱ्या कोणाच्याही नाटकाना एवढी गर्दी झाली नाही, हे उघड आहे. धंद्याच्या दृष्टीनेंच ऑसबर्नची नाटके यशस्वी झाली असे नाही. खरे म्हणजे जॉन ऑसबर्नच्या 'लुक बॅक इन अँगर' या नाटकाने इंग्रजी रंगभूमीला एक नवे वळण दिले. ८ मे १९५६ रोजी इंग्लिश स्टेज कंपनीने या नाटकाचा प्रयोग केला. जिमी पोर्टर हा या नाटकाचा नायक इंग्लंडमधील तरुण पिढीचा प्रतिनिधी मानला जाऊ लागला आणि जिमीच्या जळजळीत शब्दानी लब्धप्रतिष्ठीत समाज बेचैन झाला. नाटककार जॉन ऑसबर्न हा कादंबरीकार किंग्सले एमीस, जॉन वेन, जॉन ब्रेन, टीकाकार कोलीन विल्सन यांच्याप्रमाणेच माथे भडकलेला एक तरुण आहे असे शिक्कामोर्तब झाले. खरे म्हणजे 'अँग्री यंग मेन' हे या सगळ्याना चिकटलेले 'लेबल' मोठे दिशाभूल करणारे आहे. कारण आपली 'संतप्त तरुण' म्हणून संभावना होते याचाच संताप जॉन वेनना अधिक येतो. किंग्सले एमीस रागावण्यापेक्षा हसतात आणि हसवतात जास्त! जॉन ऑसबर्नच्या नाटकात मात्र या संतापाचा स्फोट झालेला दिसतो. ऑस्बर्नच्या बरोबरीने ब्रेंडन बेहान, वेस्कर, शीला देलानी, हॅरोल्ड पिंटर, सिंप्सन वगैरे नाटककारानी गेल्या दहा वर्षात नाटके लिहिली. तरल कल्पनाशक्तीचे देणे लाभलेल्या पिंटरना किंवा सिंप्सनना आपले अनेकरंगी, अनेकपदरी अनुभव अधिक सूक्ष्म रीतीने, तिरकस आणि तेढ्या पद्धतीने, प्रतिमा किंवा प्रतीकांच्या द्वारा व्यक्त करणे अधिक मानवते. बेकेट किंवा योनेस्को यांच्यामुळे आज सर्वत्र चर्चिल्या जात असलेल्या 'अतार्किक' रंगभूमीला पिंटर किंवा सिंप्सन अधिक जवळचे आहेत. याउलट आर्थर मिलर किंवा ब्रेश्तसारख्या नाटककारानी ज्या सामाजिक, वास्तववादी नाटकांचा पाठपुरावा केला त्या प्रकारची नाटके ऑसबर्न, वेस्कर किंवा शीला देलानी वगैरे मंडळीना पसंत असावीत असे त्यांच्या आजवरच्या लेखनावरून वाटते. अर्थात् ही गटवारी करताना ती या घटकेपुरती खरी व तीही स्थूलमानाने याचे भान ठेवावयास हवे. कारण समकालीन कलावंताविषयी विशेषतः ज्यांची कला अजून पूर्ण उमलायची आहे, फुलायची आहे, त्यांच्याविषयी असली विधाने करण्याचे साहस अंगलट येण्याचा संभव असतो. कलावंत म्हणून ऑसबर्नपेक्षा पिंटर श्रेष्ठ आहेत असे आता काहीजण उघड उघड म्हणत आहेत. काहींना वेस्कर अधिक आवडतात. पण ऑसबर्नविषयी फारसा अनुकूल अभिप्राय व्यक्त न करणारी मंडळीही ऑसबर्नचे ऋण नाकबूल करीत नाहीत.

## 'भूता'कडे रागाने पाहणारी पिढी

नव्या पिढीने दिलेल्या सलामीची पहिली फैर झडली ती दहा वर्षापूर्वी ऑसबर्नच्या 'लुक बॅक इन अँगर' या नाटकाचा प्रयोग झाला तेव्हा! हे नाटक लंडनच्या रंगभूमीवर आलेले ऑसबर्नचे पहिले नाटक असले तरी त्याच्या आधी ऑसबर्नच्या दोन नाटकांचे प्रयोग इतर शहरात झाले होते असे जॉन रसेल टेलर या समीक्षकाने सांगितले आहे. याखेरीज रंगभूमीवर न आलेल्या काही नाटकांची हस्तलिखिते पडून असल्याचे स्वतः ऑसबर्ननीच कबूल केले आहे. नाटकाच्या केवळ तंत्राचा, रचनेचा विचार केला तर 'लुक बॅक इन अँगर' हे नाटक त्यावेळच्या पठडीतल्या नाटकासारखेच एक नाटक वाटते. कॅथरीन वर्थना तांत्रिक दृष्ट्या ऑसबर्नचे हे नाटक १९०६ मध्ये झालेल्या गॅल्सवर्दीच्या 'सिल्व्हर बॉक्स' या नाटकाहून वेगळे वाटत नाही. तर टेलरनाही ते रूढ झालेल्या वास्तववादी परंपरेतील एक चांगले रचलेले नाटक वाटते. अशा तऱ्हेने ऑसबर्नच्या या गाजलेल्या नाटकाची बंदिश जुन्या वळणाची असली तरी त्याचा आशय आणि विशेषतः तो आशय व्यक्त करणारी शब्दकला नवीन होती. त्यामुळेच प्रथम अनेकानी या नाटकाचा प्रयोग करण्यास नकार दिला. अखेर इंग्लिश स्टेज कंपनीच्या जॉर्ज डीव्हाईननी ते रंगभूमीवर आणण्याचे ठरवले आणि पहिले काही प्रयोग झाल्यानंतर दूरचित्रवाणीवरून जेव्हा काही भाग दाखवण्यात आला तेव्हा खरी या नाटकाने गर्दी खेचण्यास सुरुवात केली.

नाटकाचा नायक जिमी पोर्टर हा पंचविशीतला तरुण, एका खोलीत संसार करणारा, ॲलीसन या श्रीमंत मुलीशी त्याचा प्रेमविवाह झालेला. मिठाई विकून गुजराण करणारा जिमी हा नेहमी अस्वस्थ असतो. संतापाने सारखा धुमसत असतो आणि लब्धप्रतिष्ठीतावरला आपला सारा राग ॲलीसनवर काढत असतो. ॲलीसन गरोदर असते; पण ती त्यासंबंधी जिमीला काही सांगत नाही. जिमी आणि ॲलीसनबरोबर जिमीचा मित्र क्लिफही तेथेच राहात असतो. नाटकाच्या पहिल्या अंकाच्या सुरुवातीपासून ते अखेरपर्यंत जिमीची लब्धप्रतिष्ठीत समाजाबद्दलची चीड उसळून वर येत असलेली दिसते. दुसऱ्या अंकात ॲलीसनची मैत्रीण हेलेना आलेली दिसते. तिने ॲलीसनच्या वडलाना तार करून बोलावलेले असते. आपला मित्र ह्यू याची आई अत्यवस्थ असल्याचे जिमीला कळते. जिमीने हे सांगितल्यावरही ॲलीसन वडलांबरोबर

निघून जाते. हेलेना जिमीकडे आकृष्ट होते. क्लिफ घर सोडून जातो. ॲलीसनचं मूल जिवंत राहात नाही. ती जिमीकडे येते. जिमीबरोबर राहणे आपल्याला अशक्य आहे हे हेलेनाच्या लक्षात येते आणि पुन्हा ॲलीसन–जिमी यांचे मीलन होते.

–असे कथानक असलेल्या या नाटकाचे सामर्थ्य नेमके कशात होते? जिमीच्या मुखाने इंग्लंडमधील तरुण पिढीच्या असंतोषाला, क्रोधाला वाचा फुटत होती. लब्धप्रतिष्ठितांच्या श्रद्धास्थानावर, मूल्यावर निर्दयपणे हल्ला चढवताना जिमीचे शब्द शस्त्रासारखे परजले जात होते. जिमीचा हा संताप ॲलीसन, क्लिफ किंवा हेलेना यांच्याबरोबर बोलत असताना व्यक्त झाल्यासारखा दिसतो. पण खरे म्हणजे बऱ्याच वेळा जिमीचे संभाषण चालले आहे असे वाटण्यापेक्षा त्याचे स्वगत बोलणे चालले आहे असेच वाटते. ॲलीसनला डिवचण्यासाठी तिच्या कुटुंबीयांची तो मुद्दाम टवाळी करीत असला तरी ॲलीसन त्याला उत्तर देत नाही. क्लिफ आणि ॲलीसन त्याचे बोलणे ऐकून घेत असतात. सबंध नाटकावर जिमी पोर्टरचा एवढा प्रभाव आहे की त्याच्या व्यक्तीरेखेसमोर इतर व्यक्तीरेखा फिक्या वाटतात. अगतिकपणे जिमीच्या भोवती वावरणाऱ्या या साऱ्या व्यक्ती त्याला केव्हाच शरण गेलेल्या असतात. नाटकाच्या सुरुवातीला जिमीविषयी ऑसबर्नने परिचयात्मक जे लिहिले आहे किंवा त्याची भूमिका वठविणाऱ्या नटास ज्या सूचना दिल्या आहेत त्यावरून जिमी पोर्टर हा आपला नायक त्याना आदर्श वाटतो असे दिसत नाही. पण सुवेझ पेचप्रसंगामुळे व हंगेरीतील घटनामुळे क्षुब्ध झालेल्या तरुण पिढीला जिमी पोर्टरच्या मुखाने आपल्याच भावना बोलल्या जात आहेत असे वाटले. जिमी पोर्टर हा अणुयुद्धाच्या सावल्यानी काळवंडून गेलेल्या नव्या युगाचा उद्गाता ठरला.

### यशाच्या संदर्भातले सौजन्य

खुद्द ऑसबर्नना मात्र आपले हे गाजलेले नाटक फारसे आवडत नाही असे दिसते. एक जुन्या पठडीतले नाटक म्हणून ऑसबर्ननी स्वतःच या नाटकाचे वर्णन केले आहे. आता आपण या नाटकास हात लावण्यास धजत नाही असे ते स्वतःच म्हणतात. असे असले तरी 'लुक बॅक इन अँगर' या नाटकाला इंग्रजी रंगभूमीच्या इतिहासात फार मोठे स्थान मिळाले आहे. कारण या नाटकाने नाटककाराला पुन्हा महत्व मिळवून दिले. या नाटकाचा प्रयोग होण्यापूर्वी रंगभूमीवर नटाचे वर्चस्व होते. १९५४ साली आयव्हर ब्राऊनने म्हटले होते की प्रेक्षक व नाटक कंपन्यांचे व्यवस्थापक हे नाटकातील संवाद लिहिणाऱ्या माणसापेक्षा ते म्हणून दाखवणाऱ्या नटाच्या आवाजाने अधिक आकर्षिले जातात. विल्यम आर्मस्ट्रांगनी म्हटल्याप्रमाणे आता पुन्हा एकदा नाटककाराला महत्व आले आहे. नाटकात दम नसला की पडद्याला टाळी पडल्याचे कौतुक होते. प्रकाश–योजनेबद्दल पाठ थोपटली जाते. सेट चांगला मांडल्याबद्दल वाहवा होते. या तांत्रिक अंगाना महत्व असले तरी अखेर नाटयकृती ही महत्वाची गोष्ट आहे हे विसरून चालणार नाही. ऑसबर्नच्या 'लुक बॅक इन अँगर'मुळे नाटककाराची उपेक्षा करून किंवा नाटकाला गौण मानून चालायचे नाही, याची तीव्र जाणीव झाली.

### नाट्यलेखनाच्या मर्यादा

ऑसबर्नच्या त्यानंतर रंगभूमीवर आलेल्या 'दि एंटर टेनर' या नाटकात लॉरेन्स ऑलीव्हिअेसारख्या प्रथितयश नटाने भूमिका केली होती ही घटना मोठी अर्थपूर्ण आहे. हे नाटक नव्या तंत्राने लिहिले गेले. जुन्या इब्सेन प्रणीत नाटकाची रूढ परंपरा आपण सोडत आहोत याची जाणीव स्वतः ऑसबर्नना होती असे या नाटकाला त्यानी जोडलेल्या टीपेवरून दिसते. तांत्रिकदृष्टया हे नाटक 'प्रायोगिक रंगभूमीला' साजेसे होते असे कॅथरीन वर्थ म्हणतात. या नाटकाच्या रचनेवर ब्रेश्तच्या नाटकांचा पगडा दिसतो. लॉरेन्स किचिन याना ऑसबर्नच्या 'एंटर टेनर'वर आर्थर मिलरच्या 'डेथ ऑफ अ सेल्समन' या नाटकाचा प्रभाव आहे असे वाटते. 'दि एंटर टेनर'चा नायक आर्ची राईस हा पन्नाशीच्या जवळपासचा एक कलावंत. त्याचा बाप बिली राईस हा सत्तरी उलटलेला एके काळी गाजलेला कलावंत. आर्ची राईसला बापाविषयी आदर वाटतो. बापाचे यश आर्चीच्या वाटयाला आलेले नाही. आर्थिक दृष्टया ओढगस्तीचा त्याचा संसार. आर्चीला पत्नीबद्दल अनुकंपा वाटते म्हणूनच इतर स्त्रियांशी संबंध असूनही आर्ची बायकोला सोडून जात नाही. फ्रँक आणि मिक हे आर्चीचे दोन मुलगे आणि जीन ही त्याची मुलगी. जीन आपल्या प्रियकराशी–ग्रॅहॅमशी भांडून घरी येते. युद्धावर गेलेला तिचा भाऊ मिक पकडला गेला असल्याची बातमी वृत्तपत्रात आलेली असते. ती आर्चीकडून तिला समजते. आर्चीच्या पत्नीचा मिकवर फार जीव असतो. आर्ची ही बातमी आपल्या वडलांना किंवा पत्नीला सांगत नाही. मिकसाठी आणलेला केक बिलीने खाल्याने आर्चीची बायको संतापते. सुनेच्या बोलण्यामुळे सासरा दुखावला जातो. आर्चीच्या मेहुण्याने आर्चीने केनडात येऊन तेथे त्याच्या मेहुण्याने चालवलेल्या उपाहारगृहाचे व्यवस्थापक व्हावे असे सुचवलेले असते. फ्रँकला देशांतराची कल्पना पसंत असते. मिकच्या मरणाची वार्ता येते. नंतर म्हातारा बिलीही मरतो.

अशी ही राईस कुटुंबाची कहाणी. आर्ची राईस ही जिमी पोर्टरचीच पन्नाशीतील आवृत्ति वाटते. जीन, फ्रँक आणि आर्ची यांच्या मुखानी ऑसबर्ननी आवतीभोवतीच्या घटनावर कोरडे उडवले आहेत. पण जिमी पोर्टरच्या शब्दातला केवळ जळजळीत संताप

अनुक्रमणिका

आर्चीच्या बोलण्यात दिसत नाही. आर्चीच्या उद्‌गारात अपयशाने आणि वैफल्याने पछाडलेल्या माणसाचा कडवट-पणा अधिक उमटतो. नाटकात ऑस-बर्नंनी गीतांचा उपयोग केला आहे. पण ऑसबर्नंनी गीत-लेखनाच्या वाटयाला न जाणे बरे असे वाटते. गीतलेखन हा ऑसबर्नचा प्रांत नाही असे टेलरनी निःसंदिग्धपणे म्हटलेले आहे.

गीतलेखनाप्रमाणेच विडंबनही ऑस-बर्नना फारसे साधत नाही, असे दिसते. 'दि वर्ल्ड ऑफ पॉल स्लीकी' हे त्यांचे नाटक पडले याचे हे एक महत्त्वाचे कारण होते. वृत्तपत्रसृष्टीचे विदारक चित्रण करण्याचा ऑसबर्नचा उद्देश दिसतो. निरनिराळ्या क्षेत्रातील प्रसिद्ध माण-सांच्या खऱ्याखोटया लफडयांचे तिखट-मीठ लावून वर्णन करणाऱ्या व गलिच्छ व्यक्तिगत टीकेवर पोट जाळणाऱ्या स्तंभलेखकावर ऑसबर्नचा रोख आहे. नाटकाला ऑसबर्नंनी जी अर्पणपत्रिका जोडली आहे त्यात त्याना वाटणारी चीड स्पष्ट झाली आहे. पॉल स्लीकी या टोपण नावाने वडया लोकांच्या लफडयाविषयी लिहिणारा जॅक ओकहॅम हा या नाटकाचा नायक आहे. जॅक आपल्या सासऱ्याविषयीही लिहीत असतो. पण त्याच्या धनाढ्य सासऱ्याला त्याची माहिती नाही. जॅकचा सासरा आणि जॅकच्या वृत्तपत्राचा मालक यांचे वैर असते. जॅक हा आपल्या प्रतिस्पर्ध्याचा जावई हे त्या मालकाला ठाऊक नसते. जॅकचे त्याच्या विवाहित मेहुणीशी संबंध असतात आणि या विवाहित मेहु-णीच्या नवऱ्याचे जॅकच्या बायकोशी! या गुप्त संबंधामुळे जी गुंतागुंत निर्माण होते तिने नाटक व्यापले आहे. पंत-प्रधान, संसद सदस्य, अमीर उमराव, न्यायाधीश, सैनिक, शास्त्रज्ञ, पत्रकार वगैरेवर ऑसबर्नंनी भरपूर तोंडसुख घेतले आहे. पण उपरोध, उपहास यानी तीक्ष्ण बनलेल्या शॉच्या चुरचुरीत संवादा-तील सामर्थ्य त्यात नाही. ऑसबर्नची या नाटकातील गीतेही सामान्य आहेत.

### आकार नवा पण आशय तोच

या पडलेल्या नाटकानंतर व्यावसायिक दृष्टया अत्यंत यशस्वी ठरलेले ऑस-बर्नचे 'ल्यूथर' नाटक रंगभूमीवर आले. शारीरिक आणि मानसिक दोन्ही दृष्टीनी अस्वस्थ झालेल्या मार्टिन ल्यूथरचे आणि पोपविरुद्ध त्याने केलेल्या झगडयाचे मनोवेधक चित्रण ऑसबर्नंनी या नाट-कात केले आहे. जिमी पोर्टरप्रमाणेच ल्यूथरही सर्व नाटकभर एवढा प्रभावी वाटतो की, त्याच्या तुलनेने इतर पात्रे फिकी वाटतात. इ. स. १५०६ ते १५३० या कालखंडातील ल्यूथरच्या जीवनातील महत्त्वाच्या घटना नाटकात रंगविल्या आहेत. धर्मोपदेशक म्हणून मार्टिनचा स्वीकार केला जातो. त्या प्रसंगापासून नाटकास सुरुवात होते. नाटकाच्या अखेरीस विवाहित मार्टिनचे चित्रण केले आहे. 'लुक बॅक इन अँगर'-प्रमाणेच या नाटकातही संभाषण चालले आहे असे वाटण्यापेक्षा स्वगत भाषणे ऐकत आहोत असेच वाटते. काही वेळा












तर चक्क स्वगत भाषणानीच सबंध प्रवेश व्यापले आहेत. 'ल्यूथरच्या' रचनेवरहि ब्रेश्तची छाया पडली आहे. ऑसबर्नना 'ल्यूथर'चे चित्रण कां करावेसे वाटले असावे? कॅथरीन वर्थ म्हणतात त्याप्रमाणे ल्यूथरच्या जीवनातील भडकपणा आणि त्याचा उद्धटपणा यामुळे ऑसबर्नना तो प्रिय झाला असेल का? ल्यूथर ही एका तऱ्हेने जिमी पोर्टरचीच आठवण करून देणारी व्यक्तीरेखा. 'ल्यूथर' हे ऑसबर्नचे नाटक नाटककाराच्या तंत्रावरच्या पकडीची साक्ष देते. किंबहुना नव्या तंत्राने लिहीलेले एक प्रयोगदृष्टचा समर्थ नाटक म्हणून प्रेक्षकाप्रमाणेच समीक्षकानाही ऑसबर्नची त्याबद्दल पाठ थोपटली आहे. मात्र ऑसबर्नमधली नवनिर्मितीची शक्ति संपुष्टात आली की काय असा सवाल या नाटकाच्या संदर्भात जॉन टेलर या समीक्षकाने १९६२ साली प्रसिद्ध केलेल्या आपल्या पुस्तकात विचारला होता. ल्यूथर हे नाटक वाचताना ऑसबर्नच्या कुशल कारागिरीचाच ठसा जास्त उमटतो.

**प्रगतीचा एक आलेख**

टेलरचे पुस्तक प्रसिद्ध झाल्यानंतर गेल्या चार वर्षांच्या काळात ऑसबर्नची आणखीही काही नाटके रंगभूमीवर आली आहेत. टेलरनी व्यक्त केलेली शंका खरी ठरत आहे असे ऑसबर्नच्या अलीकडच्या नाटकावरून वाटते. 'प्लेज फॉर इंग्लंड' या नावाने दोन नाटके प्रसिद्ध झाली आहेत. त्यातले पहिले 'दि ब्लड ऑफ दि बँबर्गस' हे नाटक दोन अंकी आहे तर दुसरे 'अंडर प्लेन कव्हर' ही एकांकिका आहे. राजघराणे आणि राजघराण्याभोवती परंपरेने निर्माण झालेले वलय हे ऑसबर्नच्या टीकेचे नेहमीचे विषय आहेत. 'दि ब्लड ऑफ दि बँबर्गस' हे दोन अंकी नाटक या विषयानेच व्यापले आहे. राजपुत्र विल्हेल्मचे मेलानी या राजकन्येशी लग्न व्हावयाचे असते; पण राजपुत्र विल्हेल्म

**वात्रटिका**

**अपशकुन !**



**रंगेल दांपत्य स्कुटरवरून निघालं**
**वाटेंत मांजराचें जोडपं आडवं आलं !**
**अपघातांत बोकोबाची प्राणहानी झाली**
**'माणसं (स्कुटरवरली) आडवी आली'**
**मनी विव्हळली—**

मोटार अपघातात मरण पावतो. त्याचा भाऊ राजपुत्र हेन्रीश हा नादान असल्यामुळे ऐनवेळी त्याला लग्नासाठी उभे करणे शक्य नसते. विवाहसोहळचाची जय्यत तयारी झाली असताना नियोजित वर मेल्यामुळे त्याच्या ऐवजी त्याच्यासारख्या दिसणाऱ्या रसेल या छायाचित्रकाराचे राजकन्येशी लग्न लावून दिले जाते. जुळा भाऊ शोभावा एवढे साम्य असलेल्या माणसाला राजा म्हणून करण्याची कल्पना फार जुनी आणि चावून चोथा झालेली. राजघराण्याचे विडंबन करण्याचा ऑसबर्नचा प्रयत्नही अयशस्वी झाला आहे. या नाटकात ऑसबर्नचे कल्पना दारिद्रय जास्त जाणवते. 'अंडर प्लेन कव्हर' ही एकांकिका मात्र त्या मानाने बरी वाटते. टिम व जेनी या जोडप्याचे सुखी जीवन ती दोघे सख्खी भावंडे असल्याच्या बातमीने कसे उध्वस्त होते याचे चित्रण या एकांकिकेत आहे. पण अशा घटनांकडे केवळ खळबळजनक बातमी म्हणून पाहणारे व ती सर्वांच्या अगोदर मिळवण्यासाठी व सजवून मांडण्यासाठी धडपडणारे पत्रकार हा 'दि वर्ल्ड ऑफ पॉल स्लीकी'मधला विषयच पुन्हा या एकांकिकेत येतो. आणि ऑसबर्नची पत्रसृष्टीवरील भाष्येही या एकांकिकेचा परिणाम मनावर होऊच देत नाहीत.

'इनअँडमिसीबल एव्हीडन्स' हे ऑसबर्नचे नाटक १९६४ साली रंगभूमीवर आले. नाटकाची सुरुवात एका स्वप्न दृश्याने होते. नाटकाचा नायक सॉलीसिटर बेल मेटलंड याला आपण आरोपीच्या पिंजऱ्यात उभे आहोत असे वाटते. अज्ञात न्यायाधीशासमोर माहीत नसलेल्या आरोपाबद्दल चाललेल्या या खटल्यात मेटलंड आपला बचाव करू पाहतो. काफकांच्या 'ट्रायल'शी साम्य असलेला हा प्रसंग मेटलंडला पडलेले स्वप्न म्हणून ऑसबर्नंनी दाखविला. मेटलंड हा चाळीशीला पोचलेला एक सॉलीसिटर. घटस्फोट आणि किरकोळ लैंगिक गुन्हे यासंबंधीच्या खटल्यात हा सॉलीसिटर विशेष लक्ष घालतो. व्यावसायिक दृष्टचा त्याचे वर्तन चांगले नसल्याचे 'लॉ सोसायटी'च्या लक्षात आले आहे आणि 'लॉ सोसायटी' त्याच्याविरुद्ध कारवाई करणार आहे. मेटलंडची मुलगी, त्याची प्रेयसी, त्याची कारकून, त्याचा साहाय्यक, त्याचा टायपिस्ट ही सर्व आवतीभोवतीची माणसे त्याला सोडून जातात आणि एकाकी मेटलंड लॉ सोसायटीच्या वतीने आपल्याविरुद्ध केल्या जाणाऱ्या उपाययोजनेची वाट पाहात राहातो. जिमी पोर्टर किंवा मार्टिन ल्यूथरप्रमाणेच मेटलंडची व्यक्तीरेखा एवढी प्रभावी आहे की मेटलंडच सारे नाटक व्यापून टाकतो. जॉन ग्रॉस या समीक्षकाने म्हटल्याप्रमाणे हे नाटक म्हणजे तीन तासाचे स्वगत भाषण वाटते आणि तरीही तीन तास प्रेक्षकाला जागच्या जागी खिळवून ठेवण्याचे सामर्थ्य या नाटकात निश्चित आहे. ऑसबर्नवर परखड टीका करणाऱ्या सुप्रसिद्ध अमेरिकन कादंबरीकार आणि समीक्षक मेरी मॅक्कार्थी यानी देखील ऑसबर्नच्या या नाटकाला असामान्य स्वगत भाषण म्हटले आहे हे लक्षात घेण्यासारखे आहे. 'ल्यूथर' नंतर ऑसबर्नचे हेच नाटक गाजले. सॉलीसिटर मेटलंडची व्यक्तीरेखा जिमी पोर्टरसारखीच जिवंत व रसरशीत झाली आहे.

**नाटककार संपला नाही**

'ए पेट्रियट फॉर मी' या ऑसबर्नच्या अगदी अलीकडच्या नाटकामुळे मात्र

अनुक्रमणिका

अनुकूल–प्रतिकूल टीकेचा मारा ऑसबर्नवर झाला. या नाटकातील काही भाग नाटयप्रयोगास परवानगी देणाऱ्याना आक्षेपार्ह वाटल्याने या नाटकापुरते नाटयगृहाचे रुपांतर क्लबमध्ये करण्यात आले. अशा तऱ्हेने कायद्यातील पळवाट हेरुन ऑसबर्नचे हे नाटक सादर करण्यात आले. या नाटकाच्या कथानकाला इतिहासाचा आधार आहे. नाटकाचा नायक रेड्ल हा ऑस्ट्रिया-हंगेरीच्या साम्राज्याच्या सैन्यातील एक अधिकारी आहे. इ. स. १८९० ते १९१३ या कालखंडातील ऑस्ट्रिया-हंगेरीच्या साम्राज्याचे चित्रण यात केले आहे. नाटकाचा नायक रेड्ल याला समलिंगी संभोग आवडतो. त्याच्या या नादामुळे तो झारच्या हेरांच्या जाळयात सापडतो आणि रशियासाठी हेरगिरी करू लागतो. अखेर त्याच्या वरिष्ठाना त्याचे खरे स्वरूप समजते. आणि त्यानी दिलेल्या पिस्तुलाच्या साहाय्याने रेड्ल आत्महत्या करतो. प्रोफ्युमो प्रकरणाचा हा रंगभूमीवरील स्वैर अनुवाद आहे काय हा मेरी मॅक्कार्थीचा प्रश्न अर्थपूर्ण आहे. ऑस्ट्रिया-हंगेरीच्या साम्राज्यातील ज्यू-द्वेषाचे चित्रण करण्याचाही ऑसबर्नचा उद्देश असावा. या नाटकातील जवळजवळ नव्वद पात्रापैकी बऱ्याचशा व्यक्तीरेखा समलिंगीसंभोगाची आवड असणाऱ्यांच्या किंवा ज्यूंच्या किंवा दोन्हीही वैशिष्टये असलेल्या माणसांच्या आहेत, या गोष्टीकडे मेरी मॅक्कार्थीनी लक्ष वेधले आहे. नाटकातील एखाद दुसरा प्रवेश सोडला तर नाटक कंटाळवाणे झाले आहे असे मॅक्कार्थीनी म्हटले आहे, तर इतर काही समीक्षकाना हे मत मान्य नाही असे दिसते.

ऑसबर्नच्या या नाटकाखेरीज त्यांच्या आणखीही काही नाटयकृतींचा उल्लेख करावयास हवा. ‘एपिटाफ फॉर जॉर्ज डिलॉन’ हे नाटक त्यानी अँथनी क्रीटनच्या सहकार्याने लिहिले. फ्रेडरिक लम्ले या समीक्षकास १९६० पर्यंत रंगभूमीवर आलेल्या ऑसबर्नच्या सर्व नाटकात हेच नाटक आवडते. या नाटकाची रचना उत्कृष्ट आहे एवढेच नव्हे तर सर्व नाटयकृतीतच एक सुसंवादित्व आहे. सर्वसाधारणपणे ऑसबर्नच्या नाटकात नायकाला तुल्यबल असा प्रतिस्पर्धी नसतो. त्याच्या आवतीभोवतीची सर्व पात्रे नायकाच्या मानाने फिकी पडतात. ‘एपिटाफ फॉर जॉर्ज डिलॉन’ या नाटकातील नायकास मात्र रूथची जबरदस्त व्यक्तीरेखा आव्हान देते.

‘अ सब्जक्ट ऑफ स्कँडल अँड कन्सर्न’ हे ऑसबर्नचे नाटक बी. बी. सी.ने दूरचित्रवाणीवरून सादर केले. नास्तिक मताचे जाहीर प्रतिपादन करणाऱ्या जॉर्ज जेकब या एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात प्रसिद्धीस आलेल्या सामान्य माणसाची कहाणी ऑसबर्नने या नाटकात सांगितली आहे. देव, धर्मग्रंथ आणि ख्रिश्चन धर्म यांच्यासंबंधी अश्रद्धा फैलावण्यासारखे वर्तन केल्याच्या आरोपावरून त्याला शासन केले जाते. हे नाटक नाटक नसून एक लांबलचक व्याख्यान झाले आहे हा टेलर यांचा अभिप्राय रास्त आहे. म्हणूनच ते फार काळ तग धरू शकले नाही.

## मर्म आणि वर्म

ऑसबर्नची ही सगळी गाजलेली व पडलेली नाटके वाचताना काही गोष्टी विशेष जाणवतात. ऑसबर्नच्या जवळजवळ सर्वच नाटकावर नायकाचे प्रभुत्व आहे. हे नायक नाटकावर एवढे वर्चस्व गाजवतात की, इतर पात्राना त्यांच्या आधीन होण्याखेरीज अगर निमूटपणे या नायकांच्या प्रकट चिंतनाचे साक्षीदार होण्याखेरीज दुसरे काही करता येत नाही. ऑसबर्नच्या या सर्व्याच नायकाना व्यक्तीगत समस्या आहेत. पण या व्यक्तीगत समस्यांचा ते भोवतालच्या सामाजिक परिस्थितीशी दुवा जोडू

पाहातात आणि या निमित्ताने समाजावर भरपूर तोंडसुख घेतात. लब्धप्रतिष्ठ समाजाचा कोणताही घटक त्यांच्या तडाख्या-तून सुटत नाही. म्हणूनच राजघराणे, धर्मपीठ, लष्कर, परंपरानिष्ठा, राजकीय नेते आणि ढोंगी पत्रकार या सर्व प्रस्था-पित समाजाच्या आधारस्तंभावर ऑस-बर्नचे नायक कडाडून हल्ला चढवतात.

ऑसबर्नचे नायक हे प्रस्थापित समाज-रचनेवर जोराने आघात करीत असल्या-मुळे ऑसबर्नच्या नाटकाकडे डाव्या विचारसरणीचे लोक आकृष्ट होत असावेत. आपल्या वैचारिक भूमीकेचे स्पष्टीकरण स्वतः ऑसबर्ननेच केले आहे. समाजवाद हे पोथीनिष्ठ तत्त्वज्ञान नसून ती एक प्रयोगात्मक कल्पना आहे. स्वातंत्र्य आणि सत्यासंबंधीचा तो एक दृष्टीकोन आहे असे त्याना वाटते. समाज-वादी समाज ज्या मूल्यांवर अधिष्ठीत असतो त्या मूल्यांचे दर्शन आपण नाट-काच्या माध्यमातून घडवतो असा ऑसबर्नचा दावा आहे. लोकाना या मूल्याविषयी काहीतरी मनापासून वाटावे आणि मग त्यानी वाटल्यास त्यांचा विचार करावा यासाठी आपली धडपड आहे असे ऑसबर्नने सांगितले आहे. दोन-अडीच तास प्रेक्षकाला जागच्या जागी खिळवून ठेवून हे साधायचे अशी त्यांची कल्पना आहे. ऑसबर्नचा हा उद्देश नेह-मीच सफल झाला आहे असे नाही. पण त्यांची सर्व नाटके वाचीत असताना हा प्रयत्न ते करीत आहेत असे जाणवते.

ऑसबर्नच्या नाटकात वृद्ध माणसांच्या काही हृदयस्पर्शी व्यक्तीरेखा दिसतात. 'लुक बॅक इन अँगर'मधील जिमी पोर्टरचा सासरा. 'दि एंटर टेनर'मधला आर्ची राईसचा बाप, 'ल्यूथर'मधला ल्यूथरचा बाप ही सगळी व्यक्तीचित्रे फार हळूवार हाताने रंगवली आहेत. वस्तुतः ही सर्व माणसे ज्या काळात वाढली त्या काळावर ऑसबर्नच्या नाय-कांचा राग आहे. पण तरीही या काळाचे ऑसबर्नना कुठेतरी सुप्त आक-र्षण वाटत असावे असे वाटत राहते. ऑसबर्नच्या अस्वस्थ, असंतुष्ट नायकाना सुखासमाधानाने आयुष्य घालवलेल्या या वृद्ध मंडळींचा मनातून हेवा वाटत असावा अशी समजूत होते. ऑसबर्नच्या वास्तववादात दडलेल्या या 'रोमँटिक' प्रवृत्तीमुळे ही वृद्ध माणसांची व्यक्तीचित्रे एवढी सहानुभूतीने रंगवली गेली असतील का?

ऑसबर्नने जसजशी नाटके लिहिली तसतशी नाटककार म्हणून त्यांची बल-स्थाने आणि मर्मस्थानेही स्पष्ट होत गेली. त्यांच्या नाटकास येणाऱ्या डाव्या विचारसरणीच्या वासामुळे उलटसुलट टीकेचे वादळही उठवले गेले. ते शॉ-इतके थोर आहेत की नाहीत यासंबंधी चर्चा झाली; अजून होत आहे. पण समकालीनाप्रमाणे मागून येणाऱ्या लेखका-वरही प्रभाव टाकणे हे जर समर्थ कलावंतांचे लक्षण असेल तर ते ऑस-बर्नजवळ आहे असे त्यांच्या कडव्या टीकाकारासही कबूल करावे लागेल.

● ● ●








अनुक्रमणिका







कथाकार–नवे. जुने नव्हे. अजून कथा येतात. कथेवरून (गेल्या दीपावलीतील 'चन्द्र') कथा हेच यांच्या लेखणीचे बलस्थान असा ग्रह व्हायचा. पण लेखणी समर्थ आहे म्हणून प्रभावी कथा समूर्त होते हे खरे मर्म आहे. अनौप-चारिकतेचा स्पर्श होऊन त्यांच्या नांवाचे 'माटुंगम्' सारखे 'नाव्यंम्' झाले आहे. 'अजून' ची ही आस्था. प्रसिद्धी:– दीपावली, मराठवाडा इ. तून लक्षवेधी कथा झळकल्या.

१. व्यथेची कथा आणि कथेची व्यथा

२. असाहि माणूस आहे

# पहायची फक्त वाट



दैवगति मोठी विचित्र आहे हेच खरं. लाडिसाच्या डावात एकदा डाव येईनासा झाला म्हणजे शेवटपर्यंत येतच नाही. तसंच माझ्या आयुष्याचं झालं आहे. ही काळतोंडी या गुणाची निघेल असं स्वप्नात तरी वाटलं होतं काय? खुद्द माझ्याच लग्नाची परवड झाली. इकडचा स्वभाव पडला गरीब. कुणाला म्हणून उलटं बोलायचं नाही. सदान्कदा कसलीतरी भीड बाळगून वागायचं. सर्वांनी त्याचा फायदा उठविला.

मुकुंदा पुष्कळसा त्यांच्याच वळणावर गेलाय्. मोठ्या कष्टानं त्याचं शिक्षण पुरं केलं. डोळ्यात तेल घालून त्याला वाढविला आणि आशेची फुलवात तेवत ठेवली. वकिलीची परीक्षा झालीय् त्याची. दोनतीन वर्सं झाली. धंद्यात जम बसवतोय्. वाटलं, केलेल्या श्रमाचं सार्थक झालं. आता एकदा त्याचं लग्न होऊन नातवाला मांडीवर खेळवला की, सुखानं डोळे मिटेन. पण मना-सारखं दान पडायचंच नाही असं जर सटवीनं माझ्या कपाळी लिहून ठेवलं असलं तर तो तरी काय करणार ?

लग्न झाल्यानंतर वाटलं. चला, एका जबाबदारीतून मोकळी झाले. सटवी वागायची देखील किती सालसपणे. कधी डोळा वर करून पाहील तर शपथ. शेजारच्या वेन्द्रीणबाई म्हणत होत्या तेच खरं. खालमुंडी न् पाताळधुंडी म्हणजे पाताळधुंडीच !



अनुक्रमणिका

मनातली वेदना ठुसठुसतेय्. पाठीवरच्या चटक्याची आग भाजून काढतेय्. भोवती डॉक्टर आहेत. माणसे आहेत आणि तरीही मी वाट पाहतेच आहे. पण कां ?

लग्नानंतरच्या तिसऱ्या महिन्यातच तिला ओकाऱ्या सुरू झाल्या. तेव्हाच मला संशय आला. पण वाटलं तिला वरं नसेल. सावित्रीबाई म्हणाल्या देखील की, होतं असं कधी कधी......

पण काल मात्र खात्रीच पटली अगदी. दुपारची कामं आटोपून माडीवर जाते तो निश्चिंतपणे घोरत पडल्या होत्या बाईसाहेब. मुद्रेवर कशी अगदी गरीब गाईची कळा! अंगावरचा पदर अस्ताव्यस्त झाला होता. मी हलक्याच पावलानं जवळ गेले. अगदी निरखून पाहिलं. पोट चागलंच मोठं दिसतंय्. अगदी चारपाच महिन्याच्या गरवारशीसारखं. माझी खात्रीच झालीय्. त्याक्षणीच लाथ घालून हाकलून द्यावी असा विचार आला. पण मुकुंदा घरी नाही. उगाच आकांडतांडव करून आपल्याच तोंडानं वेअब्रू कशाला बाहेर पसरावयाची?

पण मुकुंदा तरी काय तोंड उघडून बोलेल ? वडिलांचाच वारसा घेतलेला. वास्तविक लग्न त्याचं. त्यानं तरी नीट चौकशी करायची? नेभळटच मेला. पण तो तरी काय करणार म्हणा? त्याची काय चूक ? अलीकडे प्रथा बोकाळली आहे ना? कुठल्यातरी पोरीवर फिदा व्हायचं आणि सांगायचं आईबापांना की आमचं प्रेम आहे. तसं तरी यानं केलं नाही ! रीतसर मुलगी सांगून आली होती. सर्व काही पहिल्या वळणाप्रमाणंच झालं. मीच पसंत केली या कारटीला आणि निखारा पदरात घेतला.

त्यानं नापसंत केली असती तर मी तरी त्याच्या मनाविरुद्ध गेले असते का ? पण याचं आपलं एकच पालुपद. 'आई, तुला पसंत आहे ना ? मग माझं काही म्हणणं नाही.' अरे बाबा, संसार तुला करायचा आहे. तूं नको का काही स्वतः विचार करायला? पण याचं आपलं असंच...

बरं. मी तरी का कमी चौकशी केलीय् ? कार्टी दिसायला चारजणात उठून दिसणारी (म्हणूनच कोणा मेल्याच्या दृष्टीला फशी पडली...!) घराणं जुन्या वळणाचं. आईबापहि सालस. त्यांची नातेवाईक मंडळीही ओळखीची. चारचौघांच्याकडे चौकशी केली असता त्यांनीही अगदी तोंड फाटेपर्यंत सांगितलं: "फारच सज्जन मंडळी वरं! तुम्ही निर्धास्त असा." घरी वडीलधारं कुणी नाही. एक आधार म्हणजे दादा. दादानं चौकशी केली. त्याचंही समाधान झालं. सांगा आता, यापेक्षा चौकशी तरी कसली करायची?

आमचं एक राहू द्या. त्या मेल्या आईबापानी तरी असं करायचं का? तोंडावर सज्जनपणाचा आव नुसता. पण असली दुष्ट फसवणूक...? त्याना नक्कीच ठाऊक असलं पाहिजे. तरीच ते मुहूर्ताची गडबड करीत होते. मी म्हटलं, एकुलता एक मुलगा आहे आमचा. मलाही थोडीबहुत जमवाजमव करायची आहे. पांचसहा महिन्यांनी करू लग्न. पण यांचा आपला एकच लकडा, "मुलीची जोखीम मोठी वाईट असते. एकदा ठरल्यानंतर फार लांवणीवर टाकू नये." अरे चांडाळानो, हीच जोखीम होती वाटतं वाळगीत !

या वयेला वाटतं की, मला काही कळालंच नाही. काल रात्री आली, पाय चेपू का विचारायला. 'माझ्या पायाला शिवू देखील नकोस.' असं जेव्हा म्हटलं तेव्हा रडायला लागली.

"माझ्या हातून आगळीक तरी काय झाली ?" असं विचारू लागली.

"आता तुझा नवरा गावाहून आला म्हणजे नमजेल." मी तरी आताच कशाला सगळं बोलू? आगळीक म्हणे! ढोंगी मेली. करून सवरून मोकळी अन् वर अगदी निष्पाप चेहरा राखता येतो. नाटक कंपनीत तरी जायला हवी होती. छान् जमलं असतं तिचं.

ते काही नाही. आता मुकुंदा आला की, सरळ तिला उचलून आईबापांच्या पदरी घालून मोकळं व्हायचं. सांगायचं. ही जोखीम भलतीच जड आहे. आमच्यानं निभत नाही. तुम्हीच ती सांभाळा. यापुढं आमचा तुमचा संबंध नाही...

सरळ दुसऱ्या लग्नाच्या तयारीला लागयचं. पण अलीकडे कायदे तरी काय विचित्र झालेत! पूर्वीचं अगदी ठीक होतं. घटस्फोटाची भानगड नाही अन् काय नाही. एकीला टाकली की, दुसरं लग्न लावायला मोकळीक. सरकारनंच या बायकाना फाजील वनवलंय्. पूर्वी नवरा दुसरं लग्न करील या धाकानं तरी निमूट राहायच्या. आता कसला धरबंधच राहिला नाही... पण मुकुंदा आता वकील झालाय् ना. बघील तो कायदा. विचारील चारचौघांना....आता त्याच्याच वाटेकडे डोळे लावून बसलेय्.

[ २ ]

काल अपीलात केस हरलो. अगदी मनापासून जिद्दीने अपील चालवले. माझा अशील देखील निराश झाला नाही तितका मी झालो. मनाला उगीचच खंत लागून राहिली. जिल्ह्याच्या ठिकाणाहून परत येताना एस्. टी.त रणवरे वकील भेटले. ते कोर्टात होतेच. त्यानी माझी समजूत काढली. मला म्हणाले "अहो सुरुवातीला असं वाटतं. अशीलाशी इतकं आयडेंटिफाय् होऊ नये वकीलानं. पुढं पुढं तुमच्या लक्षात येईल. मन लावून काम करायचं आणि निकालाबावत समाधानी वृत्ति ठेवायची." रणवरे वकील सीनीयर आहेत. त्यांचा अनुभव दांडगा आहे. खरं आहे त्यांचं म्हणणं. पण तरुणपणातील गरम रक्ताला अपयश बोचत राहतं, खेचत राहतं...

घरी आलो. वाटलं कालिंदी हसतमुखानं पुढं येईल. हातातील बॅग काढून घेईल. पाय धुवायला गरम पाणी देऊ का म्हणून विचारील. पण दारात कुणीच नव्हतं. दार बंद करून घर मख्खपणे पहात उभं होतं. मला काही बरं वाटलं नाही. एकदा वाटलं: "अपयशी माणसाचं असंच स्वागत करायचं असतं."








दाराची कडी खडाखडा वाजवताच आईनं दार उघडलं. मी स्तंभीतच झालो. अंगात कडाडून ताप यावा तशी आईची मुद्रा झाली होती. अंगाला शाल लपेटून ती तशीच आली होती.

आईला विचारलं. "कां ग? बरं नाही का अंगात?"

"बरं नसायला काय झालंय्? पण आपलंच नशीब खोटं. त्याला कोण काय करणार?"

काहीतरी विपरीत प्रकार झाला असं वाटलंच. मी चटकन् पुढचं दार लावलं.

मला बकोटीला धरून ती माडीवर घेऊन गेली. मी प्रवासातील कपडे अद्याप काढलेच नव्हते. पलंगावर बसकण घेऊन तसाच आईच्या तोंडाकडे पहात राहिलो.

"काय झालं तरी काय?" मी पुनः विचारलं.

"काय व्हायचं कपाळ? नाणं नुस्तं पाहून घेतलं. नुसती झिलईच पाहिली. वाजवून घेतलं नाही. नाणं खोट निघालं." आई एकसारखी रडू लागली. मग आईनं जो प्रकार सांगितला त्यानं तर सुन्नच झालो. डोळ्यात भिरभिरलं. कोपऱ्यातला वडगा घेतला अन् खोलीचं दार उघडू लागलो. आईनं घाबरून मला मागे खेचलं.

"मुकुंदा, उगाच मारवडव करून घराची शोभा करून घेऊ नकोस. आपलंच हंसं व्हायचं. चारचौघात कळायच्या अगोदरच तिच्या माहेरी रवानगी करून दे. तुझ्या सासऱ्याच्या पदरात घाल तिला उद्याच अन् मुकाट्यानं परत ये. नंतर बाहेर येणारच आहे ते...माझीच चूक झाली रे मुकुंदा...तुझ्या आयुष्याचं नुकसान केलं रे मी..." असं म्हणत आई माझ्या गळ्यात गळा घालून स्फुंदू लागली.




माझ्या हातातील अवसान गळून पडलं. मी तसाच केस पिस्कारीत बसून राहिलो. तरीच अपील चालवत असताना छातीत उगाचच काहूर येत होतं. पुढे येणाऱ्या संकटाची चाहूल देताना मनाची पाल चुकचुकते म्हणतात ते काही खोटं नाही.

बायका कधी पुरुषांना विचारणार नाहीत, आई आपल्या मुलाला कधी विचारणार नाही असले काही प्रश्न विचारून आई निघून गेली.

तिला काय उत्तरं दिली अन् माहिती पुरवली माझं मलाच आठवत नाही. मी तसाच बसून राहिलो.

"कालिंदी, कालिंदी! काय घोर फसवणूक केलीस माझी. कशासाठी?"

रात्री जेवायला उठलो नाही. मेंदूच्या आतून तप्त सळ्या कवटी फोडून बाहेर येऊ पाहात होत्या.

झोपायच्या सुमारास कालिंदी आली. माझे पाय धरू लागली. त्याच पायानं झिडकारलं मी. क्षमा मागायला आली होती वाटतं.

"तुमच्या पायाची शप्पत. तसलं काही माझ्या हातून झालेलं नाही...."

"काही एक ऐकून घेणार नाही मी."

"पोटात वाढणारा गर्भ तुमचाच आहे हो...विश्वास ठेवा माझ्यावर."

इतका वेळ मी संयमित होतो. पण तिच्या वाक्याने खवळलो. फाडकन् मुस्कटात दिली तिच्या...

तशीच जमिनीवर पडून राहिली होती ती. मी जोरजोरात फेऱ्या घालीत होतो. विचार आला... मी शिकलो नसतो तर फार बरं झालं असतं. मनात उलट सुलट विचारांचा पिंगा सुरू झाला नसता. व्यवहाराचं गणित कसं चटदिशी सुटलं असतं. एखाद्या ग्यानबानं सरळ तिला घराबाहेर घालवलं असतं. चारचौघात मारबडव केली असती. जातीची पंचायत बसवली असती. काडीमोड लावून मोकळा झाला असता. किती सोपं गणित!

मी एकदा कालिंदीकडे पाहून घेतलं. खरंच. अगदी निष्पाप चेहेऱ्यानं तशीच बसली होती. अट्टल गुन्हेगार देखील असा चेहेरा करू शकतो. खुनी खटल्यातील गुन्हेगाराची दीनवाणी चर्या मी पाहिली होती.

मग काहीतरी आठवलं. मी दरडावून विचारलं...

"कालिंदी इकडे ये."

तिला धीर आला असावा.

ती थरथरत होती. तिचे दोन्ही दंड गच्च आवळीत, डोळ्याला डोळा भिडवून, क्रुद्ध श्वापदाच्या नजरेनं मी तिला विचारलं...

"मग खरं सांग...लग्न झाल्यापासून तू बाहेर कधी बसली होतीस?"

"एकदाच."

"केव्हा?"

"मी माहेरी असताना...पहिल्याच महिन्यात."

अनुक्रमणिका






मी तिचं अस्तित्वच क्षणभर विसरून गेलो. लग्न झाल्यानंतर पहिल्याच महिन्यात माहेरी गेली होती ती. मला सोडून राहवत नव्हतं. पुनः पुनः निरोप पाठविले. सोवत्यांच्याकडून चेष्टा झाली.

मला तिच्या केशकलापांचा ओलसरपणा स्पर्श करून गेला. तिच्या केसातून दरवळणारा शिकेकाईचा खमंग वास खात खात मी सारी रात्र धुंदीत घालवली होती. नाग-नागिणीची ती रात्र माझ्या मनात एक लय धरून अद्यापपर्यंत वसली होती.

आता आठवलं सारं. . .पण तीही फसवणूकच कशावरून नसेल? बायका दर आठवडा-पंधरवडयाला न्हातातच. त्याचा फायदा घेऊन आणि त्याचा निर्वाळा देऊन कालिंदी मला फसवू पाहात होती.

तिला न्याहाळत मी म्हणालो, "इतकं मोठं कसं तुझं पोट? लग्न होऊन चार महिनेहि लोटले नाहीत. . . ."

"ते मात्र मी सांगू शकत नाही. माझं मलाच ठाऊक नाही ते. . ." ती मुसमुसत म्हणाली.

"कसं ठाऊक असणार? . . ." मी छद्मीपणानं बोलून गेलो. नंतर काय काय बोललो ते काही आठवत नाही.

दुसऱ्या भिंतीला लागून असलेल्या पलंगाकडे तिला लोटत मी ओरडलो, "नीज जा आता. लौकिक दृष्टया पतिपत्नीची ही शेवटची रात्र. आज मी तुला परका झालो. तू मला परकी झालीस. उद्या सूर्योदयासरशीच तुझी माहेरी रवानगी. पुनः तुझं तोंड दाखवू नकोस मला."

तिला झोप आली नाही. मला तर येणे शक्यच नव्हते. आम्ही एकमेक भिंतीकडे तोंड करून आपापल्या पलंगावर आडवे झालो होतो. तिच्या मनात काय चाललं होतं कुणास ठाऊक! कदाचित् त्याची आठवण काढत असेल. कदाचित् मला हंसत असेल मनातून. कोण जाणे?". . . . बाहेरून तरी तिचे हुंदके ऐकू येत होते.

मी मात्र प्रखर सूर्याची वाट पाहात पाहात एक एक क्षण. . . . . .एकेक पळ घालवीत होतो. . .

## [३]

उगीचच वेडी आशा वाटत होती म्हणून कार्टीला घेऊन डॉक्टरीणबाईकडे गेलो. डॉक्टरीण कसली? मूळची नर्सबाईच ती. आता चक्कपणे नांवामागे डॉक्टर म्हणून पाटी लावते. या गांवढया गांवात इन् मीन् दोन डॉक्टर. त्या डॉक्टर वगाडयाकडे घेऊन जावं म्हटलं तर आताच गांवभर बभ्रा होणार. ही वया थोडी अनुभवी आहे. वाटलं, काही समाधानकारक खुलासा मिळेल. पण तिनं चक्क सांगितलं की, चार महिने पुरे झाले आहेत.

विठ्ठला काय रे जीवघेणा प्रसंग आणलास माझ्यावर! या घराण्यात पंढरीची वारी आजवर कधी चुकली नाही. घरचे कुलाचार पाळताना कसूर कधी झाली नाही. दारावरच्या भिकाऱ्याला रिकाम्या हातानं कधी परतवलं नाही. काय हे किटाळ आलं? काय त्या पोरीची वाताहत!

अगदी लहानपणापासूनचे दिवस आठवतोय्. कधी कुसंस्काराचा स्पर्श तिला झाल्याचं स्मरत नाही. मग आताच कुठं शेण खायला गेली ही? बरं, नीट आम्हाला तरी स्वच्छ आडपडदा न ठेवता सांग म्हटलं तर हूं का चूं नाही. जशी काय दांतखीळ बसलेली कार्टीची.

त्या दिवशी सूर्योदय होतोय् न होतोय् जांवईबुवा आणि विहीणबाई कालिंदीला घेऊन उभ्या! 'ही जड जोखीम आम्हाला परवडत नाही' असं म्हणून तिला ठेवून गेल्या. तिच्या सासूची जीभ भारी तिखट. नाही नाही ते बोलून गेली हिला. तिची समजूत तरी कोणत्या तोंडानं घालणार आम्ही? आपलाच दाम खोटा म्हणायचं झालं.

घरी इथं कोणी परक्यानं आल्याचं आठवत नाही. कधी अंधार झाल्यानंतर घरी परतल्याचं आठवत नाही. कॉलेजमध्ये थेर शिकण्याचा प्रश्नच नव्हता. मग शाळेत काही झालं का? कुणावर म्हणून संशय घ्यायचा? आणि घेऊन तरी आज त्याचा काय उपयोग?

तिची पाठवणी झाल्याच्या रात्रीच तिनं देवाला शिवून सांगितलं की, आपल्या हातून पाप झालं नाही म्हणून. त्यावेळी मी मनात थरारलो. खोटं बोलून देव्हाऱ्यातल्या देवाला आजवर तरी या घरात कुणी शिवलं नाही. कुणी असं शिवलं तर काय होतं याचे प्रत्यक्ष दाखले मी पाहिले आहेत. पण कुणी सांगावं? मूर्तीमध्ये देवत्व तरी आज शिल्लक आहे का?

हिनं कालचा तो अघोरी उपायही करून पाहिला. केवढा डाग












उठला आहे पोरीच्या पाठीवर. मला बघवलं नाही ते! कातडी भाजल्याचा चर्रर आवाज देखील ऐकू आला. वाटलं, माझ्या हृदयालाच कुणीतरी चटके देतय्. तिच्या तोंडून मात्र 'हाय्' असा शब्दही नाही. सारं कसं निमूटपणे सहन करीत होती. ही निगरगट्टपणाची कमाल म्हणावी कीं दिव्य म्हणावे? काही समजत नाही. काही उमजत नाही. घरातलं हास्य कधीच निमालंय्. मनमोकळ्या बोलण्यावर कायमचं विरजण पडलंय्. दोन वेळा जेवायचं, नित्यनैमित्तिक काम निमूटपणं उरकायची. काही आनंद आहे का त्यात?

घरातल्या शिक्षणाचा आणि संस्काराचा केवढा अभिमान मला! पैशाची प्रतिष्ठा नसली तरी आजवर या बळावर मान ताठ करून चालत असे मी. आज मात्र अर्धांग होऊन शरीर लुळं पडल्यासारखं वाटू लागलंय्. आपल्याच माणसाकडून झालेली वंचना फार अघोरी असते. परवा तिच्या सासूबाई ा म्हटलं, "डॉक्टरांकडून तपासून घेईन आणि खात्री पटवीन तुमची." कसली खात्री पटवायची आता कपाळ? आज संध्याकाळी तिची सासू येऊन जाईल. कोणत्या तोंडानं सांगू डॉक्टरीणबाईचं मत मी? वर त्यांचे खोचक कुजके उद्गार ऐकावयाचे! विठ्ठला, विठ्ठला... डोळे तरी का आमचे मिटवून टाकत नाहीस बाबा....

काही उपाय सुचत नाही. मार्ग मोकळा दिसत नाही. भिंतीवरचे घड्याळ टिक् टिक् करते आहे. पोरटी माजघरात तोंडावर पांघरूण घेऊन पडली आहे. ही खालच्या मानेनं केर काढीत आहे. सर्वांचा कणाच निघून गेला आहे. वाट पहात आहोत त्यांची. तिची सासू आता येईल...थोड्या वेळात येईल.

तिला आपल्या उत्तराची खात्री आहे. हातापाया पडून सांगितल्यावर ती पुनः यायला तरी कबूल झाली. हेच उपकार म्हणावयाचे.

काही उपाय सुचत नाही. मार्ग मोकळा दिसत नाही.
शेवटी पंढरपूर आहेच...



[४]

कालिंदीला सांभाळत कसाबसा रस्ता पार केला. काही म्हणा, या मुंबईतील रस्त्यांचे मला फार भय वाटते. इथली माणसं कशी बिनचूक रस्ता ओलांडतात. मधाशी त्या टॅक्सीवाल्याने गाडी आवरली म्हणून बरं. नाहीतर साराच ग्रंथ आटोपला असता. बिल्डिंगपाशी आलो. इथेही दुर्दैव आड आलं. लिफ्ट नादुरुस्त होती. चार जिने आता कसे चढून जायचे? मी कसाबसा चढलो असतो. पण कालिंदीला चार जिने चढण्याचे श्रम कसे झेपले असते? मी असहाय्यपणे कालिंदीकडे पाहिले. तिच्या चेहेऱ्यावर कसलाच भाव नव्हता. रस्ता ओलांडल्यामुळे झालेले श्रम मात्र स्पष्ट दिसत होते. पण त्या चेहेऱ्यावर असहाय्यता नव्हती. डोळ्यातील कारुण्यही कोठे लोपून गेले होते. त्यामध्ये औत्सुक्यही नव्हते, निराशाही नव्हती. जसा काही कोरा करकरीत कागद. एक चीड मस्तकात सणसणून गेली. एवढी उरस्फोड करून पोरीला मुंबईला आणली...एवढी जिद्द बाळगून तिच्या आईवडिलांशी तंडलो, तिची बाजू घेऊन घसा कोरडा केला, याचं यत्किंचित्‌ही तिला काही वाटू नये? मुंबईपर्यंतच्या प्रवासात अवघी चार वाक्यंही धड बोलली नाही. एकवार वाटलं...कशाला पाहिजे आपल्याला हा खटाटोप? न्यावी तिला परत आणि खुशाल आई-बापांच्या हवाली करावी, आपण मोकळे व्हावे. पण आक्कासाठी जीव तीळ तीळ तुटतोय्. बळवंतरावांसारख्या सात्विक माणसाचा सदा सतेज चेहेरा कायमचा म्लान झालेला मला पाहवला नसता. पण त्याहीपेक्षा या पोरीची वाताहत मला पाहवली नसती.

"मामा..."
"काय कालिंदी?"
"एकदोन मिनिटं बसतेय् इथं. दम लागलाय्."
"बैस पोरी."

आपल्या कृश हातांचा आधार घेऊन ती खालच्या पायरीवर विसाव्यासाठी टेकली. लग्नामध्ये घातलेल्या तिच्या बांगड्या सळ्दिशी तिच्या तळव्यांच्या मध्यापर्यंत जाऊन पोहोचल्या.

मला परवाचे डॉक्टरांचे बोलणे एकसारखे आठवत होते. मन आशंकेने भरून गेले होते. ते काय निर्णय देणार आहेत? त्यांचे शास्त्र त्याना काय सांगणार आहे? पदरी आशा पडणार का निराशेचा जड धोंडा? जीर्ण झालेली झोळी फाडून चिंध्या करणारा?

सगळी परीक्षा आटोपल्यानंतर, कालिंदीची मी सांगितलेली सर्व कथा ऐकून झाल्यानंतर डॉक्टर क्षणभर स्वस्थ बसले होते. माझ्या जिद्दीची, विश्वासाची धार बोथट करायची होती की काय कुणास ठाऊक? ते म्हणाले: "मिस्टर पत्की, आता जग झपाट्याने बदलत चालले आहे. नीतीमत्तेच्या कल्पना बदलत चालल्या आहेत. ही माझी मुले, ही तिची मुले आणि ही आमची मुले अशा कोष्टकात बसलेले संसारही आता आढळू लागले आहेत. पूर्वीच्या निष्ठा आणि विश्वास आता डळमळायला लागले आहेत. कुणी कुणाचीही हमी घेऊ शकत नाही आता.





अनुक्रमणिका

मुंबईमध्ये आम्ही दिवसेंदिवस पाहतोच आहोत ना? आता तुमच्या गांवाकडची मला काही कल्पना नाही म्हणा. पण आपल्या विश्वासावरच केवळ जाऊ नका. आतापर्यंतच्या परीक्षेवरून तरी पांच एक महिने झाले असावेत असे अनुमान निघते. पण अद्याप एक परीक्षा राहिली आहे..."

त्याच वेळी कालिंदी साडी सावरीत आतल्या खोलीतून बाहेर आली. तिच्या कानावर त्यांचे शेवटचे शब्द पडले असावेत. ती कडवटपणे एकदम म्हणाली, "कसलीही परीक्षा शिल्लक ठेवू नका डॉक्टर! अगदी अग्निदिव्य सुद्धा".

डॉक्टर चमकले. मीही.

एक्सरे घ्यायचा ठरला. एक्सरे त्याच दिवशी घेतला. आज एक्सरे फोटोचा निकाल कळायचा होता.

कालिंदीबरोबर पायऱ्या चढताना जीव एकसारखा घोटाळत होता. काय लिहून ठेवले आहे त्या रिपोर्टात? आशेला काही जागा आहे का? का मुंबईपर्यंत आल्याचे परिश्रम फुकट? मी तिरक्या नजरेनं कालिंदीकडे पाहिले. ती धिमेपणाने पायऱ्या चढत होती.

डॉक्टरांच्या रिसेप्शन्‌रूममध्ये बसलो. माझ्या अगोदर सात आठ नंबर लागलेले होते. समोरच्या टीपॉयवरची मासिके चाळू लागलो. खोलीमधले भिंतीवरचे घड्याळ पंधरा पंधरा मिनिटांनी ठोके द्यायचे. एकवार वाटले की, घड्याळाचा लंबक हाताने गच्चं धरून ठेवावा. माझ्या अगोदर आलेली माणसेही कशी श्वास रोधून बसली होती. कसले असतील त्यांचे प्रश्न?

डॉक्टरांच्या खोलीतून एखादा रोगी गंभीर चेहेरा करून बाहेर पडे तेव्हा मला अतिशय गुदमरल्यासारखे वाटे. एखादी बाई हंसतमुखाने बाहेर पडली कीं अंतःकरणातील लाख कळ्या उमलल्यासारखा भास होई. कालिंदी आपली वर गरगर फिरणाऱ्या पंख्याकडे एकाग्रतेने पाहात बसली होती.

माझा नंबर लागला तेव्हा धडधडत्या अंतःकरणाने मी उठलो. कालिंदीच्या पाठीवर हात ठेवत मी खोलीत शिरलो. डॉक्टर त्यावेळी प्रकाशाने उजळलेल्या दुधी कांचेवर एक्सरे फोटो ठेवून निरीक्षण करीत होते. माझ्याकडे न बघताच म्हणाले:

"या मिस्टर पत्की. There is some good news for you." असं म्हणता म्हणता त्यांनी दुधी कांचेमागील दिवा विझविला आणि फिरती खुर्ची गर्कन् वळवून आम्हाकडे पाहू लागले.

मी आवंढा गिळला. कालिंदी निश्चल होती.

"यांच्या पोटात जुळे आहे. त्यामुळे पोट मोठे दिसते. काही काळजीचे कारण नाही. तुम्ही दिलेल्या व यांनी सांगितलेल्या तारखा अगदी बिनचूक आहेत."

मी कपाळावरचा घाम पुसू लागलो तेव्हा डॉक्टर म्हणाले, "तुमची व्यथा जाणतो मी, मि. पत्की. पण तुम्हा सर्वांपेक्षा यांची काय दशा झालीय् ती पाहिलीत का? She is under-nourished too much. यांची आता खूप काळजी घेतली पाहिजे तुम्ही. मी टॉनिक्स लिहून देतो. सर्व काही ठीक होईल. फक्त यांच्या तब्येतीची काळजी घ्या मात्र..."



अनुक्रमणिका

त्यांचं सांगून झाल्यानंतर मी तसाच थांबलो हे पाहून ते म्हणाले, "आणखीन् काही?"

मी अडखळलो. "तसं काही नाही. माझं समाधान झालंय्. पण...पण..."

"हां...हां...त्यांच्या मिस्टरांचं म्हणतां होय. असं करता का? त्यांना इथं तार करून बोलवा. त्यांच्यावरोबर समक्षच बोलेन मी."

मनावरचे दडपण उतरल्यामुळे मी उत्साहाने बोललो,

"आजच, असाच तार देतो मी. ते आल्यानंतर पुनः भेटेन मी."

"ठीक आहे."

टॅक्सीतून घरी परतताना मी कालिंदीला जवळ ओढलं. तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणालो, "मुंबईला आल्याचं सार्थक झालं पोरी आज. तुझ्यावरचं किटाळ गेलं एकदाचं. आतां हंस वघू खळखळून. आता वारसं असं थाटात करू कीं यंव्!"

कालिंदीनं फक्त एक दीर्घ निःश्वास सोडला.

वस्स!

[ ९ ]

घरात वारशाची गडवड चालू आहे.

पलीकडच्या खोलीत माझ्या दोन लहान मामेवहिणींमध्ये मुलांची नांवे काय ठेवायची याची चर्चा सुरू आहे...त्यांचे संवाद अस्पष्टपणे कानावर येत आहेत. कानात कसले तरी नाना प्रकारचे आवाज ऐकू येत आहेत. कशाची कशाला संगति लागत नाही.

मी पायाकडे नजर लावून आहे. पलीकडे दोन कोरे करकरीत पाळणे दिसताहेत. एकाएकी ते हलू लागतात. घड्याळाच्या लंवकाप्रमाणे ते टिकटिकल्यासारखे वाटतात. त्यांचाच तो आवाज की छातीतल्या माझ्या यंत्राचा?

वाजेखालच्या धगीची फक्त जाणीव आहे.

वाजारातून काय काय आणायचं ते वावा आईला विचारीत आहेत स्वयंपाक घरात. त्यावरोवरच कोणाकोणाला आज जेवायला बोलवावयाचं राहिलं आहे याचीही आठवण करताहेत ती दोघं...

—कानात आवाज फार ऐकू येऊ लागलेत.

मघा सकाळी हे दोनदा येऊन गेले. प्रथम तासभर वसले होते...

किती दिवसांनंतर त्यांची गांठ! खोलीत कोणी नाही असे पाहून त्यानी माझ्या कपाळावर हळुवारपणे हात ठेवला.

"फार सोसलंस तू..."

मी ग्लानीमध्ये पुटपुटले, "हुं"

"तशी माझी खात्री होतीच आतून..."

त्या रात्री माझ्या दंडाला करकचून धरून विचारले होते. त्या वळांवरून मी हलकेच हात फिरवते. दंड अजून हुळहुळतोय्.

"दोन्ही मुलं थेट माझ्यासारखी आहेत म्हणते आई."

"असं-?"

वाजेखालची शेगडी आज चांगली फुललेली दिसते.

कानात आवाज फार ऐकू येतात.

त्यांच्या मनात पुष्कळ वोलायचं आहे असं दिसलं. माझ्या तोंडातून शब्द फुटत नाहीत.

त्यांचा स्वर अजीजीचा दिसतो.

ते केव्हा निघून गेले ते समजलं सुद्धा नाही.

वाळंतपणात तसा फार त्रास झाला नाही म्हणतात. खरंखोटं देव जाणे? मला शुद्ध कोठे होती?

धकवा फार वाटतोय्.

पाठीवर आईनं दिलेला डाग अद्याप माझी कातडी जाळतोय्. मुंबईला जिद्दीने गेले खरी...डाव पण जिंकला.

...अर्ध्या तासापूर्वी हे येऊन गेले.

अंगावर दूध येत नाही म्हणे. जिल्ह्याच्या ठिकाणाहून सिव्हिल सर्जनना वोलावलंय्, असं काहीसं म्हणत होते...

"वोलत कां नाहीस?"

"कानात चमत्कारीक आवाज ऐकू येतात हो."

"विचारूया सिव्हिल सर्जनना."

"वरं..."

"नांवं काय ठेवायची? तुझ्या आवडीची ठेवू या."

"माझी आवड...?"

मला पुनः ग्लानी आल्यासारखे वाटते.

"कुणाला तरी शेगडी काढायला सांगा. धग फार वाटतेय्."

हे आत सांगायला जातात.

वारशाला कोणकोण आलंय् कुणाला ठाऊक? मामा कां नाही आला अजून? तो यायला पाहिजे. त्यानं सुचविलेली नांवं ठेवू...

"वरं, मी जातो..." हे निरोप घेतात.

मी हुंकार भरते.

त्यांचा स्पर्श आठवण्याचा प्रयत्न करते. आठवतच नाही मला. हे असं काय होत आहे मला? एकसारखी कुणाची तरी वाट पहावी असं वाटतं. कोण येणार आहे अजून?

हे गेल्यानंतर आई येते.

"पोरांना अंगावर घेतलंस का?"

"अगं एक थेंवसुद्धा येत नाही." मी किंचित् चिडून म्हणते.

"जवळ तरी घे."

"आता नको...थोड्या वेळानं घेईन..." मी भिंतीकडे तोंड वळवते.

कानात होणारे आवाज अजून वंद होत नाहीत.

मुलं रडताहेत का?

कशाचा हा आवाज?

खोलीत एवढा कुंदपणा कां भरलाय् आज?

एकसारखे झोपावेसे वाटते.

मोटारीचा हॉर्न ऐकू यायला लागला आहे. डॉक्टर आले असावेत...

डोळे पुनः मिटतात.

मी पुनः डोळे उघडते.

खोलीत वरीच माणसे जमलेली दिसतात.

वाजेजवळ हे कोण वसले आहेत? डॉक्टर वाटतं. आणि हे असे कोपऱ्यात चोरासारखे कां उभे राहिले आहेत? मला ओळखता सुद्धा येत नाही यांचा चेहरा.

आई डॉक्टरांना सांगते आहे..."अजिवात दूध नाही वघा अंगावर. नुसत्या एकाचा प्रश्न नाही. दोघांचा..."

डॉक्टर तिला काही प्रश्न विचारताहेत आणि काही सांगताहेत.

मला काही त्यांचे ऐकू येत नाही.

मी फक्त वाट पहाते आहे. वाट पहावीशी वाटत आहे. कोणाची वाट? तेच तर सांगता येत नाही. सांगण्यासारखं काहीच नाही.

पाहायची फक्त वाट....!

●●●





अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



‘खऱ्या सेवाभावी परंपरेतल्या आखरी रोमनांपैकी एक....’



[२]

# आय् ॲम् नॉट पुंडलीक....

महाराष्ट्र–म्हैसूर राज्यांच्या सीमेवरच्या वादग्रस्त प्रदेशावावत उपोपणाचे निर्णायक अस्त्र केव्हा तरी उपसले जाणार याची कुणकुण लागली होती. वृत्तपत्रात पू. सेनापति वापट प्रभृति चौघांची नांवे झळकली तेव्हा मनाशी खूणगांठ बांधली की आता या चळवळीला निर्णायक स्वरूप येणार. पू. सेनापति वापटांच्या निग्रहावावत, तपश्चर्येवावत, त्यागावावत, निष्ठेवावत, निदान महाराष्ट्रात तरी कुणी अपरिचित नव्हते. सेनापतींचे घर मुलगा–सून, नातवंडे यांनी भरलेले असले तरी त्यानी योगी अरविंद पचविला असल्याची ख्यानि होती. इतर दोघेजण संसारी पुरुप होते. त्यांना वायका-मुले, आप्त-इप्ट, आई-वडील यांसारख्या रक्ताच्या नात्यातील माणसांची पाखर होती. लहान असो, मोठे असो, घर म्हणून एक वास्तु होती. तेथून कुणीतरी काळजी वाहणारे, शुभ चिंतणारे माणूस नांदत होते. उपोपकांचे वजन घटले की, ज्यांच्या वजनात फरक व्हावा, उपोपकांच्या नाड्या मंद व जलद चालू लागल्या की ज्यांच्याही नाड्यातील रक्तप्रवाह कमीअधिक वेगाने वाहू लागावा अशी माणसे त्याना लाभली होती. यापैकी चौथ्या व्यक्तीने मात्र खूप खूप वर्षांपूर्वी घर सोडले होते. रक्ताच्या मायेचे पाश तोडले होते. ‘अकिंचन्’ होण्याचा प्रयोग केला होता. ब्रह्मचर्याची शपथ घेतली होती. सारा भारत देश पायतळी घातला होता. अनेक लहानथोर चळवळींचे नेतृत्व केले होते. तरीपण ती एकाकीच राहिली होती. आपल्या साध्या-सरळ धोपट मनाला पटलेले अनेक प्रयोग केले होते. ते सुफलित झाले का फसले याची खंत नव्हती. मनाने एकदा इशारा दिला आणि टाच मारली की, चौखूर उधळायचे...अशा धुंद मस्तीत दंग असायचे....

या चौथ्या व्यक्तीचे नाव होते पुंडलीकजी कातगडे.

या उपोपणाच्या संदर्भात त्यांच्याशी मागे एकदा झालेला संवाद आठवला. उपोपण कोणी करायचे वगैरे चर्चा गेल्या एक दोन वर्षात होत होत्या. मी त्यांना एकदा विचारले होते : “तुम्ही वसणार आहात काय उपोपणाला?

त्यानी विनोदाने हंसत हंसत उत्तर दिले होते, “वेळ आली तर वसावं लागणार.” मग अशाच इकडच्या तिकडच्या गप्पा होत असताना ते काहीसे गंभीर होऊन म्हणाले : “कधी कधी काय वाटतं मला, ठाऊक आहे ?”

आता काहीतरी विनोदी किस्सा ऐकायला मिळणार म्हणून आम्ही कान टवकारून वसलो. ते आपल्या संथ शैलीत, खर्जाच्या सुरात सांगू लागले: “कित्येकदा मला असं वाटतं की मी

उपोषणाला बसावं असा आग्रह अनेकजण करतात त्याच्या पाठीमागं एक भावना असावी. मी गांधीवादी आहे, चळवळचा आहे, सत्याग्रहाचे शास्त्र शिकलो आहे. हे सारं मी समजू शकतो. पण एकदा कुणीतरी सहज चेष्टेने म्हणाले, 'पुंडलीकजी, उपोषणाला तुम्हीच बसा. तुम्हाला मागेपुढे कोणी नाही. घरादाराचा पाश नाही.' हीच भावना इतरांच्याही मनात कशावरून नसेल?" हे सांगता सांगता ते एकाएकी गंभीर झाले. डोळचाला लावलेली सोनेरी काडचांची चाळशी त्यानी काढून ठेवली आणि जाडजूड बोटांच्या पेरांनी डोळे गच्च दाबून धरले. आमच्या बैठकीचे वातावरणच बदलले. सगळे कसे चिडीचाप! तो प्रसंग, तो संवाद, शरीरावर तीक्ष्ण सुयांनी गोंदवून घेऊन एकादी आकृति उमटवावी तसा मनावर गोंदवला गेला आहे. त्याची आठवण येऊन मनात लकलकले. मन तडफडू लागले. त्याना भेटून यायला पाहिजे. कोण जाणे? पुनः भेट होईल की नाही? दुसऱ्या दिवशी पहाटेच उठलो. मुलांना सोबत नेले म्हणजे त्याना तेवढेच बरे वाटेल म्हणून मुलांनाही उठवले. रविवारची सुटी होती. पल्ला लांबचा होता. लोकल–बसचा जीवघेणा प्रवास नकोसा वाटत होता. तरीपण मला गेलेच पाहिजे होते. माझे ओळखपत्र जवळ असल्याने निळचा समुद्राच्या लाटांची भीति नव्हती. सहजी प्रवेश मिळाला. 'वर्षा' बंगल्याच्या अंगणात पाऊल टाकले. अंगणातील एका कोपऱ्यात पथाऱ्या पसरून सेनापतींसह ते तिघेही बसले होते.

मला पाहिल्यानंतर त्याना आनंद झाला. मुलांना जवळ घेतले. त्यांना प्रेमभराने कुरवाळले. दर्दभऱ्या आवाजात ते म्हणाले: "तू एकटाच भेटायचा राहिला होतास. निरोप कोणावरोबर पाठवायाचा याचा विचार करत होतो. तू आलास, बरे वाटले."

### एकांडा शिलेदार

साऱ्या अडुसष्ट वर्षातील वेदना या तीन वाक्यात मुखरित झाली होती. मी मूक झालो. व्यायामाने परिपुष्ट झालेल्या त्या धिप्पाड व्यक्तिमत्त्वाकडे पाहू लागलो. आराम करतेवेळी घालावयाची गुडघ्याखाली पोचणारी खादीची चड्डी आणि नेहरु शर्टाच्या ठराविक लांबीपेक्षा अधिक लांब असा खादीचा शर्ट (एके काळी संन्यासाची दीक्षा घ्यावयाचे ठरविले होते त्याची आठवण म्हणून एवढ्या विशिष्ट लांबीचा शर्ट ते वापरतात), शर्टाच्या वरच्या दोन्ही खिशात कोऱ्या कार्ड–पाकिटांचे गठ्ठे, तोच वेष त्यावेळीही होता. तीच वीतभर रुळणारी शेंडी, तोच ओबडधोबड चेहरा, लहानपणीच शस्त्रक्रिया केल्यामुळे 'अर्धोन्मिलित' झालेले तेच डोळ, तेच लांबट नाक. आकृति, वेष आणि रूप याबाबतही पुंडलीकजी एकांडेच राहिले! या त्यांच्या वैशिष्टचपूर्ण चेहेऱ्यामुळ बेचाळीस साली भूमिगत होऊन अद्ययावत युरोपिय पोशाखात हिंडतानासुद्धा पोलीसांना त्याना शोधून काढण्यात फारसे प्रयास पडले नाहीत!!

मंडळी येत होती. उपोषकांशी बोलत होती, जात होती. आपली जान बचावण्यासाठी आपण आपल्या प्रिय जन्मस्थळाचादेखील कायमचा त्याग केला आणि टीचभर प्रदेशाचे विलिनीकरण मराठी राज्यात व्हावे यासाठी जान कुर्बान करणारे हे अवलिया कोण आहेत ते पाहण्याच्या कौतुकामिश्रित कुतूहलाने दोन तीन सिंधी तरुण येऊन दर्शन घेऊन गेले. मी सारे पाहात होतो. स्वस्थ बसून राहिलो होतो. मला मात्र वर्तमानाचा विसर पडत चालला होता. वाचलेले, प्रत्यक्ष पाहिलेले आणि ऐकलेले प्रसंग चित्रपटातील दृश्यासारखे बदलत होते . . . कुणाची तरी बोटे बाजाच्या पेटीवरुन फिरत होती. . . .टाळांचा आवाज ऐकू येत होता . . .

राष्ट्रीय कीर्तनकार डॉ. दत्तोपंत पटवर्धन यांचे खडचा सुरात कीर्तन चालले होते! त्यांच्या खडचा सुरातील ओजस्वी बोल ऐकून श्रोत्यांची मने थरारून उठत. पद सुरु झाले की मागे आज्ञाधारकपणे उभ्या असलेल्या पुंडलीकाने टाळ वाजवायला सुरुवात करावी व आपला भसाडा आवाज त्यांच्या सुरात मिसळावा. कीर्तन संपले की, पुढे होऊन पुंडलीकाने 'वंदेमानरम्' सुरु करावे.

### बॉम्ब हवा मज बॉम्ब हवा !

नुसतेच टाळ कुटण्याने आणि 'वंदेमानरम्'चा सूर उंचावण्याने गुलामगिरीच्या बेडचा तुटतील हे त्यास खरे वाटेना. ते सारे वेचव होते याहून काहीतरी अधिक हवे होते. धाडस हवे, साहस हवे. बाहूमधील, मनगटातील रग जिरावी असे काही तरी घडायला पाहिजे होते. बॉम्बचे रहस्य हस्तगत व्हायला हवे होते; ती विद्या देणारा गुरु हवा होता . . .

शेवटी दत्तोपंत पटवर्धनांनी गंगाधररावांच्या पुढे त्याना उभे केले आणि म्हटले, "बघा या पोराचा तुमच्या देशकार्यात काही उपयोग झाला तर. मडके कच्चे आहे पण चिकणमाती अस्सल आहे. आकार ओबडधोबड आहे, पण चांगल्या खाणीतला आहे. दुभंगणारा नाही. टाकीचे घाव घालून तर पहा . . ."

झाले. त्या दिवसापासून पुंडलीकाची तपश्चर्या फळाला आली. राजकीय अध्यात्माचा गुरु भेटला. आता एक नवे पर्व सुरु झाले होते. आता टाळ वाजवायचा नव्हता, पण टाळीचा संकेत ओळखावयाचा होता. बुक्का प्रसाद वाटावयाचा नव्हता, पण गुप्त संदेश बेमालूमपणे पोचवावयाचे होते. कीर्तनातील पदे म्हणताना जो सूर मिसळावयाचा तो सूर आता गुरुच्या जळजळीत पण भावना हेलावून सोडणाऱ्या वक्तृत्वाच्या प्रचंड प्रपातात सोडून द्यावयाचा होता. बॉम्बचे रहस्य मिळण्यासाठी विठ्ठलाप्रमाणे वेळगावी विटेकरावर पुंडलीकजी बरेच दिवस तिष्ठत राहिले. पण त्याऐवजी दुसरे बरेच पाहायला मिळाले, ऐकायला मिळाले. जे मिळाले ते त्यानी अधाशासारखे जमवले, खाल्ले आणि पचवले. गुरूची सेवा करताना हातचे काही राखून









वात्रटिका

### लोचट

पॅरिसहून आला पोपट
अन् झाला मुलखाचा लोचट
बायकांच्या खांद्यावर
बसायचा
नि 'नसत्या' गोष्टी
बघायचा !

ठेवले नाही आणि परब्रह्म ज्याच्या भेटीला आले त्या पुंडलीकालाही लाजविले ! गुरूच्या मुखातून पडलेला शब्दन् शब्द उतरून ठेवायचा. प्रवासाची तयारी करताना सर्व बांधाबांध जातीने करावयाची, कपडे धुवायचे, पाय चेपायचे, झोप लागेपर्यंत गुद्दे मारीत बसावयाचे, संकेताची वाट पाहात बसावयाचे. कुठे जायचे, कशासाठी जायचे याची विचारणा न करता केवळ आज्ञापालन करावयाचे. जे जे घडते ते ते केवळ पाहावयाचे. त्याचा मनोमनी अर्थ लावायचा. मग घटनांची सुसंगती लावायची. त्यांचा अर्थ कळला की, गुरूच्या राजकारणी, मुत्सद्दी व दीर्घ पल्ल्याच्या बुद्धीचा एकेक पैलू नजरेस पडायचा. मग त्याचे एकेक अक्षर आपल्या पाटीवर कोरून काढायचे अन् गिरवायचे. . . . क्रांतिकारकांच्या गुहेत शिरावयास मिळणार म्हणून उत्साहाचे वारे संचारले होते. गुप्ततेचे रहस्यमय वातावरण अंगावर रोमांच उठवीत होते. टिळक प्रभृति नेत्यांचे पाय घराला लागत होते. गुरूच्या आश्रयाने मोठमोठ्या नेत्यांचे दर्शन पुंडलीकाला घडत होते. त्यांच्याशी बोलायला, चर्चा करायला अवसर मिळत होता . . .

**शुक्राचार्यांचे घरी**

. . . दिवस भराभर पळत होते . . . कुणाच्या जीविताची शाश्वती नव्हती. कोण, केव्हा, कशासाठी तुरुंगात जाईल याची कल्पनाच करणे शक्य नव्हते. सारे जीवन कसे अस्थिर आणि रोमहर्षक होऊन बसले होते . . . या साऱ्या चळवळीच्या धकाधकीत पुंडलीक आपल्याभोवती एक रेशमी कोष निर्माण करू पाहात होता. आईबाप वारलेले, वडील भावाच्या व्यसनाधीनतेमुळे व भावाभावांच्या तंट्यामुळे घरादाराची अक्षरशः वाताहत झालेली. मिरजेतील घर या वास्तूचा चिरान् चिरा निखळलेला होता. पुंडलीकाने तेथून मनच काढून घेतले होते. गुरूचे वेळगावातील घर हेच त्याचे घर. गुरूची सगळी माणसे हीच त्याची नातेवाईक मंडळी . . . रक्ताची, पूर्वजन्मातील नाते घेऊन आलेली. त्या सर्वांची सेवा करणे म्हणजे गुरूची सेवा करणे ही श्रद्धा. त्या एका बिंदूभोवती, त्या एका मण्याभोवती त्याला प्रेमाचा रेशमी कोष निर्माण करावयाचा होता. धागे विणायला सुरू करण्याचा अवकाश . . . कुठेतरी तो तटकन् तुटायचा. पुनः सारे विघडायचे . . . कोष कधी पुरा व्हावयाचा नाही. राजकीय जीवनाच्या त्या वावटळीतही कण्हण्यासाठी पुंडलीकाला क ही क्षण उसंत मिळे . . . केव्हा तरी असह्य झाले म्हणून स्वारी घर सोडून चालते होण्याच्या बेतात होती. त्याप्रमाणे गेली देखील आणि महाराष्ट्र–वऱ्हाड आणि मध्यप्रदेशात गीता व उपनिषदे यांच्यावर प्रवचने देत हिंडली. पण तो त्यांचा पिंडच नव्हता . . . पुनः गुरुभक्तीने, श्रद्धेने, विवेकाने त्यांना त्याच वाटेने परत आणले . . .

☆ ☆

**पुंडलीकजी,** आज तुम्ही चिंताक्रांत कां दिसता ?"

"काय सांगू नाना ? या खेपेस सावकार मिळायची फार पंचाइत झाली आहे. ×××च्या मुलाच्या इंजिनिअरिंग कॉलेजची फी भरायची आहे. त्याचं पत्र आलं आहे पुण्याहून. दोन तीन दिवसाच्या आत भरली पाहिजे. पैसे देणारी सगळी माणसं आतां संपत आली आहेत. किती दिवस देणार ती?"

**आवर्त**

हा आमचा संवाद स्वातंत्र्योत्तर काळातील एका संध्याकाळी चालला होता. क्षात्रयुग आणि वैश्ययुगातील तो संधिकाल होता. स्वातंत्र्य मिळाले म्हणजे काय मिळाले याचे सामान्य जनाला आकलन झाले नव्हते. पुंडलीकजींच्या गुरूजींनी राजकारण संन्यास घेऊन एक तपावर काळ लोटला होता. ते गुरूवर्य रा. द. रानडयांच्या यात्रेतील पथिक म्हणून मार्गक्रमण करीत होते . . . बेरड जमातीच्या मुलांना शिक्षण मिळावे, त्यांच्यावर चांगले संस्कार व्हावे म्हणून पुंडलीकजींनी काढलेली शाळा आता ओस पडली होती. कारण दारूचे ओझे घेऊन वीस पंचवीस मैलपर्यंत रात्रीदेखील डोंगराळ प्रदेशातून एवढे प्रवास करण्यास ही मुले भीत नसत. त्यांना पोटाचा नवा व्यवसाय सांपडला होता! पुंडलीकजींनी चालविलेल्या खादी–ग्रामोद्योग कार्यामध्ये भ्रष्टाचाराची उदाहरणे दृष्टोत्पत्तीस येत होती. सत्याचे प्रयोग फसले होते . . . आवर्त वाढत होता . . . उधाण आलेल्या उन्मत्त सागराप्रमाणे काळाच्या उंबरठ्यावर उभा राहून वैश्य–पुरुष दोन्ही बाहू उंचावून आवाहन करीत होता, आव्हान देत होता . . . "लोक हो, मी येत आहे . . ." त्याला थोपविणारा अगस्ति मात्र कुठे दिसत नव्हता.

मी त्याना विचारले, "काहो, तुमच्याकडून लिहून घेतात का काही?"

"अरे, नुसता शब्दाचा व्यवहार. काही लोकांचे पैसे शब्द दिल्याप्रमाणे वेळेवर पोहोचवतो म्हणून पुनः त्यांच्या दाराशी जाऊ शकतो. काही काही लोकाना मात्र तुमचे पैसे बुडाले असे सांगूनच घेतो. काही काही जणांचे असे व्यवहार पाहिले म्हणजे वाटतं की, ही माणसे गेल्या जन्मीचे माझे ऋण फेडताहेत. काका तांबे ही अशीच एक व्यक्ति." मग गप्पांचा ओघ काका तांब्यांकडे वळतो. त्यांच्याविषयी बोलताना त्यांच्या खर्जामध्ये एक प्रकारचा मुलायमपणा येतो.

**रक्त आणि पाणी**

गप्पा मारता मारता पुंडलीकजींच्या दानशूरतवर अवलंबून राहिलेला तो गरजू

विद्यार्थी सारखा डोक्यात गरगरत असतो. एकदम काहीसे आठवल्यासारखे होऊन ते उठून राहात. "त्या××ला बऱ्याच दिवसात भेटलो नाही. त्याचा व्यापार बरा चालला आहे असं ऐकतो. त्याच्याकडे पाहतो. शब्द टाकून. नाही म्हणायचा नाही तो," विचार डोक्यात यायचा अवकाश की, काढलाच आपला अवलख वारू (सायकल) बाहेर !

दुसऱ्या दिवशी सकाळी येऊन कालच्या कामाची फत्ते कशी झाली याचा किस्सा ऐकवण्यासाठी पुंडलीकजी घरी येण्यास विसरत नसत.

पुंडलीकजींच्या फाटक्या झोळीतला हा पैशाचा ओघ न आटता पुष्कळ दिवस चालला होता. अठरापगड जातीतील गरजू व हुषार विद्यार्थ्यांनी आपापले मोठमोठे शिक्षणक्रम त्यावर पुरे केले होते. त्या विद्यार्थ्यांनी चांगले यश मिळविले की, त्यांचे कौतुक आणि गुणगान जो भेटे त्याच्यापुढे होई.

ही मुले पुढे आपापल्या संसारात रमून जात. त्या त्या गावी गेले की, त्यांना भेटून आल्याशिवाय पुंडलीकजी कधी चुकले नाहीत. त्यांच्याशी असणारा पत्रव्यवहार आपणहून कधी तोडला नाही. त्याच्याकडून बऱ्याच दिवसात पत्र आले नाही म्हणजे ते अतिशय बेचैन व्हायचे. कोठल्याशा समारंभाला निमंत्रण पाठवायचे तो विसरला की, ते उद्विग्नपणे म्हणायचे– "मला एक वीटभर चिठ्ठी तरी पाठवायची ? जाऊ द्या. "Blood is Thicker than water."

हा सर्वसामान्य अनुभव गांठी येऊनही पुंडलीकजींनी आपली श्रद्धा किंवा भावना कडवट होऊ दिली नाही. रात्री बेरात्री शत्रू जरी दारात येऊन मदतीची याचना करू लागला तरी नेसत्या चड्डीनिशी ते तसेच त्याच्या मदतीला धांवतील.

ज्या ज्या घरांशी संबंध आला त्या त्या घरांशी त्यानी संपर्क ठेवला. केवळ सुशिक्षित समाजाशीच नव्हे तर 'भीतिहारवा'सारख्या बिहारमधील एका खेड्यातील अशिक्षित मंडळींशीदेखील. कोण्या एकेकाळी महात्माजींनी चंपारण्यात निळीच्या सत्याग्रहास सुरुवात केली. बिनीचे सरदार म्हणून कै. राजेंद्रप्रसादांची निवड झाली होती आणि राजेंद्रप्रसादांचा उजवा हात म्हणून सत्याग्रही पुंडलीकजींची निवड झाली होती. महात्माजींच्या कसोटीला उतरणे ही काही चेष्टेची बाब नव्हती. त्याच वेळी बिहारमधल्या अनेक खेडूत कुटुंबांशी पुंडलीकजीचा परिचय झाला. आजही दिल्ली वगैरेकडे ते गेले म्हणजे पदरमोड करून 'भीतिहारव्या'ला जाऊन, त्या त्या कुटुंबांना भेटून त्यांच्या नातवापतवंडांची खुशाली विचारल्यावाचून परत यावयास चुकणार नाहीत. पुंडलीकजींचे हृद्गत आणि व्यक्तिमत्व राजेंद्राने जाणले होते. आणि त्या राजेंद्रांनाही पुंडलीकजींनी ओळखले होते. राष्ट्रपती पदावर आरूढ असतानाही, सरकारी रीतीनिर्बंधांची विशेष अडचण न येता, राष्ट्रपतींचे द्वार पुंडलीकजींना सदैव मुक्त असे.

### मीच माझा शिल्पकार

मोठ्या वृक्षाच्या छायेखाली लहानसे झाड वाढत नाही असे म्हणतात. पुंडलीकजींच्या गुरूचे कर्तृत्व मोठे तर खरेच. पण त्यांच्या छायेत राहूनही पुंडलीकजींनी आपली अस्मिता गमावली नाही. आपले स्वतंत्र व्यक्तिमत्त्व फुलविले. आपल्या मनाप्रमाणे त्यास आकार दिला आणि ते वाढविले. ते अनेक वेळा म्हणतात, "मी गंगाधररावांची धोतरेच धुवीत बसलो असतो, तर त्यांच्या गड्यापेक्षा अधिक

वात्रटिका :

## कुऱ्हाडीचा दांडा——



एकदां काय झालं——
कोंबडीच्या पिलाला वाजली थंडी
पिलानं मग काय केलं ?
खाल्लीन् आईची चारसहा अंडीं !
कोंबडीला आला पिलाचा राग
तिनं त्याच्यावर पाखडली आग !
म्हणाली, 'जळ्ळं मेलं दळभद्रं बाळ
कुऱ्हाडीचा दांडा गोत्यास काळ !'

प्रतिष्ठा प्राप्त झाली नसती." त्यानी आपल्या गुरूची सेवा तर केलीच—अगदी आरुणीच्या निष्ठेने. पण रात्र रात्र जागून, अनेक ग्रंथ वाचून, मनन करून, गंगाधररावांच्या सान्निध्यात येणाऱ्या थोर थोर पुढाऱ्यांशी स्वतंत्रपणे चर्चा करून, गुरूचा रोष ओढवूनही—प्रसंगविशेषी मतभेद दर्शवूनही (बेळगावच्या मराठी भाषिकांची बाजू समजावून सांगण्यासाठी दिल्लीला पहिले शिष्टमंडळ जेव्हा गेले तेव्हा पुंडलीकजीही गेले होते. त्यावेळी 'He does not represent me' अशा आशयाची तार पाठविण्याची दक्षता त्यांच्या गुरुजींनी घेतली होती.) आपल्या व्यक्तिमत्वाला वेगवेगळे कोंब फोडले. प्रसंगानुरूप ते वहरत गेले. काही कोमेजले, करपले आणि गळून पडले. मिरजेच्या सारावाढीच्या चळवळीपासून बेळगावसाठी केलेल्या उपोषणापर्यंत, पुंडलीकजींचे जीवन म्हणजे सार्वजनिक जीवनाची खळाळत जाणारी, पुराने क्षुब्ध झालेली नदी आहे. महाराष्ट्रात नादान माणसांच्या देखील एकसष्टचा साजऱ्या होत असतात. पण पुंडलीकजींनी साठी उलटल्याचे कोणाच्या लक्षातही आले नाही. त्यांच्या व्यायामाने कमावलेल्या शरीराने लोकांच्या स्मृतीला कदाचित् चकविले असल्याचा संभव असला तरी त्यांच्या व्यक्तिमत्वाविषयी समजापेक्षा गैरसमजच अधिक उराशी बाळगून बसलेल्यांना त्याची क्षिती वाटली नसावी हेच कारण खरे असण्याचा संभव आहे. इंद्रप्रस्थाच्या सिंहासनावर आरूढ झालेल्या धर्मराजाने मात्र त्यांच्या जन्मतारखेची आठवण ठेवून, त्याना खास पत्र पाठवून साठाव्या वाढदिवसाच्या प्रसंगी शुभचिंतन केले होते !

याच धर्मराजाच्या गावची हकीकत आम्हाला एकदा त्यानी ऐकवून, आमची अंतःकरणे भारावून टाकली होती. डॉ. राजेंद्रप्रसाद वारल्यानंतर ते एकदा दिल्लीकडे जाऊन आले होते. नंतर डॉ. प्रसादांच्या कुटुंबियांना भेटण्यासाठी ते सदाकत आश्रमाला जाऊन आले. डॉ. प्रसादांच्या कुटुंबियांशी देखील त्यांचे अनुबंध जुळाले होते. त्या रात्री त्याना बिछाना करून देण्यात आला. बिछान्यावर जी मच्छरदाणी होती, तिला सतरा गाठी मारल्या होत्या! दुसऱ्या दिवशी घरगुती गप्पा मारता मारता डॉ. राजेंद्रप्रसादांचा मुलगा तक्रारीच्या सुरात म्हणाला होता, "राष्ट्रपति होऊन आमच्या वडिलांनी काय मिळविले आणि ठेवले? तर, एक लाखाच्यावर असणारे हे ग्रंथ!" हे सांगताना पुंडलीकजींच्या डोळयात पाणी उभे राहिले होते आणि आम्ही ऐकणारे सारे अवाक् झालो होतो. महात्माजींनी पेरलेले अपरिग्रहाचे बी सारे काही खडकावरच वाया गेलेले नव्हते!

### ऋण संपत्तीची श्रीमंती !

जी तत्त्वे आपण अंगिकारली त्यांचा निष्ठेने पाठपुरावा करावयाचा, अशी एक श्रद्धा कोण्या एकेकाळी या भूमीवर नांदत होती. पुंडलीकजीनीही प्रामाणिकपणे या निष्ठा सांभाळल्या. जिथे जिथे त्यांची मानसिक शक्ति कमी पडली, त्यावेळी पश्चातापयुक्त अंतःकरणाने गुरूजनांना, विश्वस्तांना आणि सुहृदांना पत्रे लिहून अंतःकरण मोकळे केले. वडिलार्जित असलेले उरलेसुरले उत्पन्न विकून टाकून अकिंचन होण्याचे वेळी पूज्य काकासाहेब कालेलकर यांचा आशीर्वाद मागितला होता वाटते. त्यानी आपल्या पत्रातून आशीर्वाद पाठविला आणि लिहिले : "तुम्ही जर खरोखर अकिंचन झाला असाल, तर तो विश्वजित् यज्ञच म्हटला पाहिजे. जर आता तुमच्या मनातून सज्जन, पापी, मित्र, शत्रू कोणाही संबंधाने रागद्वेष राहिला असेल तर तो काढून टाकण्याचा प्रयत्न केला पाहिजे. कधीतरी म्हणाल की नाही, 'अभयं सर्व भूतेभ्यो, मत्तः सर्व प्रवर्तते?'... वडिलार्जित शेते विकताना अत्यंत वाईट वाटले, हे स्वाभाविक आहे. कौटुंबिक जीवनाची ही अंत्येष्टि होती. आता तुम्ही द्विज झाला असे म्हणता येईल. 'मत्ता' शून्य झाली म्हणजे सत्ता अनंत होते असे गणित आहे. पण त्याला मत्ता हृदयातून निघाली पाहिजे. आज ती स्थिती नाही हे कबूल केले पाहिजे. यापुढे सूक्ष्म रीतीनेदेखील उसनवार किंवा कर्जाचा चिखल लावून घेऊ नका, असे पुनः सांगितल्यास त्याचे वाईट वाटून घेऊ नका. सतीचे जसे शील, त्याचप्रमाणे तुमचे अकिंचनत्व. धन किंवा ऋणसंपत्ती तुमचे जवळ नसावी."

धनसंपत्ति पुंडलीकजीनी कधीच केली नाही. पण भव्यदिव्य असे जे जे जाणवले त्या त्या कार्यासाठी आपली फाटकी झोळी मात्र सदैव ऋणसंपत्तीने ते भरीत राहिले. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर अनेक प्रामाणिक कार्यकर्त्यांचा जेव्हा भ्रमनिरास झाला त्यावेळी विचलित न होता, हुदली या आपल्या गुरूच्या गावी अनेक कार्यासाठी कर्ज घेऊन ज्या ज्या इमारती बांधल्या होत्या, त्या सर्व विकून टाकून तितक्याच निष्ठुर कर्तव्याच्या जाणीवेने, त्याना मदत केलेल्या उदारधींचे कर्ज अंशतः

अनुक्रमणिका

तरी फेडून टाकले... आणि हा सारा खटाटोप त्यांचा एकट्यांचा! ★★

एक दिवस पहाट फुटायच्या आतच दारावरची विजेची घंटा जोरात खणाणत राहिली. इतक्या आड-दांडपणे घंटी वाजवणारी व्यक्ति पुंड-लीकजींशिवाय दुसरी कोणी असणार नाही याची शंकाच नव्हती. दार उघडताच ते दारात दत्त! कसलेही महत्त्वाचे काम नव्हते. त्यांच्या एका स्नेह्याचे कार्ड आले होते व ते मला दाखविण्यास आले होते. स्वातंत्र्याच्या चळवळीत सर्वस्व गमावून बसलेला तो एक सामान्य मनुष्य होता. चळवळीत भाग घेतल्यामुळे सर-कारी नोकरी गेली होती. दारिद्र्याचे चटके खात- कसावसा उदरनिर्वाह करता करता त्याला वेड लागले होते. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर सगळीकडे 'सुजलाम् सुफलाम्' होणार अशी भाबडी आशा या वेड्यालाही झाली असावी. त्याचे प्रत्यंतर न आल्याने त्याने वेडाच्या भरात चिडून पुंडलीकजींना पत्र लिहिले होते. मोठे गंमतीदार होते ते. गंगाधर-रावांनी कधी काळी पुण्यात दिलेल्या व्याख्यानाने उत्तेजित होऊन त्याने आपली आंगठी देशकार्यासाठी त्याच सभेत दिली होती. तिचा लिलाव होऊन त्याच सभेत ती विकली गेली होती. आता स्वराज्य आल्याने ती आंगठी कांग्रेस सरकारने परत करावी अशी मागणी त्या वेड्या गृहस्थाने त्या कार्डात केली होती. निदान-पक्षी गंगाधररावांनी तरी ती आंगठी परत करावी असे आवर्जून लिहिले होते. त्या गृहस्थाची 'कथा' पुंडलीकजींनी त्या पहाटे ऐकवली आणि ते हसले. त्या हसण्यामागे एक करुणा होती. मी कार्ड परत देताना सहज पाहिले, कार्डाच्या एका कोपऱ्यात Replied असा शेरा व तारीख होती! ★★

**मा लिख मा लिख!**

पुंडलीकजींचा संचार अगदी धूमकेतुसारखा असतो. ते कधी येतील, केव्हा येतील व केव्हा जातील याचा काही नेम नसतो. एक दिवस ते असेच उगवले. हातात एक हस्तलिखिताचे बाड होते.

"तुला वेळ आहे का जरा?"

'जरा वेळ' म्हणजे नक्की तीन घंटे हे समीकरणच होते. मी नाही म्हटले असते तरी मला आग्रहाने बसवून, लिहि-लेले वाचून दाखविल्याशिवाय ते थोडेच राहणार! लेखनातले मला काहीतरी



अनुक्रमणिका






समजते अशी त्यांची गैरसमजूत आहे. त्यांचे ते लिखाण ऐकण्याअगोदर मी त्याना विचारले :

"पुंडलीकजी, कुणी उद्योग सांगितलाय् हा तुम्हाला ? कोठला प्रकाशक प्रकाशित करणार ते? कां उगाच पैसे खर्च करून गळयाला तात लावून घेता? तुमचे पुस्तक उत्तम असले तरी कथा कादंबऱ्याप्रमाणे का ते खपणार आहे? प्रकाशित झाल्यानंतर पुस्तकाचे गठ्ठे सायकलला बांधून घरोघरी खपविण्याचा आटापिटा तुम्हालाच करावा लागणार आहे. नसती जबाबदारी कशाला घेताय्?"

"तुला काय करायचंय् त्याच्याशी? तू नुसते ऐक आणि अभिप्राय दे. अरे पुष्कळ चांगल्या गोष्टी खपत नसल्या म्हणून त्या तयार करावयाचे थोडेच थांबविणार आपण?"

मी निरुत्तर झालो. त्यानी म्हटलेले खरेच होते. त्यांच्या या चळवळीच्या, धकाधकीच्या जीवनात त्यानी किती लिहिले याची गणतीच नव्हती. पहिला हिंदी–मराठी कोष त्यानीच तयार केला. हिंदीचे व्याकरण लिहिले. मिरज संस्थानातील सारावाढीच्याविरुद्ध केलेल्या चळवळीचा इतिहास लिहिला. गंगाधररावांची 'जीवनकथा' त्यांच्या भगीरथ प्रयत्नानेच उजेडात आली. अनेक थोरामोठयांशी पत्रव्यवहार झाला असल्याने त्यांची साधी चिठ्ठी चपाटीदेखील कृपणाप्रमाणे त्यानी जपून ठेवली. या वृत्तीतूनच त्यानी पू. काका कालेलकरांची त्याना आलेली पत्रे संग्रहित करून 'सप्रेम वंदेमातरम्' या नावाने प्रसिद्ध केली. त्यांच्या गुरुजींचे जन्मस्थान आणि त्यांची कर्मभूमी 'हुदळी' या गांवी त्यानी उभ्या केलेल्या आणि नंतर उध्वस्त झालेल्या सार्वजनिक संसाराचे दर्शन 'संस्मरणीय पर्वा'मधून घडविले. गंगाधररावांना मोठेपण मिळवून देण्यात मोठा हातभार लावणाऱ्या कै. गोविंदराव याळगींचे चरित्र अद्याप कोणी लिहिले नव्हते व पुढे कोणी लिहिणार नाही याची खंत त्याना वाटत होती. मनात कल्पना आली की, बसलेच लिहायला. अगदी अल्पावधीत ते चरित्र लिहूनही प्रसिद्ध केले—स्वतःच्या हिंमतीवर. छापखान्यांना वायदे देऊन, घरोघर पुस्तके विकून छपाईची, कागदाची बिले भागवली. अगदी प्रथितयश लेखकालाही हा विक्रम साधणे कठीण. पुस्तकविक्रीचा मागील कडू अनुभव जमेस धरूनही त्यांचा उत्साह कमी होत नाही! 'पुंडलीक' या आपल्या



आत्मचरित्रावर आठवणींचा भाग लिहिताना त्यांच्या लेखणीला विलक्षण प्रांजळपणा आला आहे. या पुस्तकाचा दुसरा भाग त्यानी अद्याप लिहिला नाही. त्यामुळे त्या अलीबाबाच्या गुहेचे दार अद्याप तिळा तिळाने उघडायचे आहे?

### कुणाच्या अदृष्टात काय आहे ?

पुस्तके विकता विकता, मधूनच ते आपल्या वरच्या खिशातून पत्रांचे जुडगे बाहेर काढतील. आलेल्या पत्रांना—मग ते कितीहि सामान्य माणसाचे असो वा एकाद्या मुलाचे असो—ते मुद्देसूद उत्तरे लिहितील. त्याच खिशातून कुंडल्याही निघतात कधी कधी. या विलक्षण पण भावड्या अंतःकरणाच्या मनुष्याला भविष्याचा नाद फार. कुणाला भविष्य वर्तविता येते हे समजताच, निघालीच कुंडल्यांची भेंडोळी बाहेर! त्यांची स्वतःची कुंडली म्हणता की काय ? छे ! छे ! त्यांच्या संबंधात आलेल्या अनेकांच्या कुंडल्या त्यांच्या संग्रहात आहेत. खुद्द त्या व्यक्तीला स्वतःच्या भविष्याची क्षिति नसेल. पण पुंडलीकजींना मात्र त्याची सदैव चिंता वाटत असते. 'तुम्ही अमूक अमूक दिवशी (वयाच्या बावन्नाव्या वर्षी) मरण पावणार' असे त्याना एका ज्योतिषाने गाडीत बऱ्याच वर्षापूर्वी सांगितले होते. बावन्नावे वर्ष लागण्याचा दिवस येण्यापूर्वीच सारी निवरानिवर त्यानी करून ठेवली होती आणि त्या दिवशी आपल्या गुरूच्या घरी, पहाटे स्नान वगैरे करून, गुरूला वंदन करून गच्चीवरील खोलीत ते एकटेच गीतापाठ करीत बसले. सूर्य अस्ताला गेल्यानंतर खाली आले. ते भविष्य खोटे होऊन सोळा वर्षे लोटली तरी भविष्याचा नाद अद्याप सुटला नाही.

अशी ही वल्ली! कुशल कारागीरालाही घडविता येणे कठीण! निरनिराळ्या प्रसंगांचे, अनुभवांचे नि आठवणींचे संचित इतके मोठे आहे आणि ते दिलखेचक शैलीत सांगण्याची शैलीही इतकी मजेदार आहे की, त्यांच्या रंगलेल्या गप्पा ऐकता ऐकता सेकंद काटाही आपले काम विसरून थबकून राहतो!

'पुंडलीक'चा दुसरा भाग लिहा लौकर असे माझे सदैव टुमणे असते. अजून त्यानी मनावर घेतलेले नाही. आता सायकलीवरचा फेरफटका सोसवत नाही. सायटिकामुळे वेदना सह्य होत नाहीत. तरीपण अंगातील जिद्द गेली नाही. अनेक भलेबुरे अनुभव आले. वाईट अनुभवांबद्दल वाच्कळ चर्चा केली नाही. चांगल्या अनुभवांबद्दल मात्र सदैव ऋणी राहिले. आपले माजी नौदल प्रमुख श्री. भास्कर सोमण यांचे लहानपण त्यांच्या सहवासात गेले. पोहण्याची विद्या त्यानीच सोमणांना शिकवली. अधिकारपदावर असताना, दिल्लीत त्यांच्याकडे ते गेले असताना दिल्लीच्या कडक थंडीत 'भास्कर'ने आपली कशी काळजी घेतली, व हातावर स्वतःच्या हाताने पाणी कसे घातले याची आठवण सांगताना आजही त्यांचा ऊर भरून येतो. राष्ट्रपती राजेंद्रप्रसादांपासून एखाद्या सामान्य 'चन्नाप्पा बसाप्पा'पर्यंत सर्वांना त्यांच्या अंतःकरणात स्थान आहे.

पण आपले कोणाच्या अंतःकरणात स्थान आहे का असा विचार त्यांच्या चित्तात जेव्हा काहूर माजवतो तेव्हा त्यांचे अंतःकरण निरागस बालकाप्रमाणे मृदु होते, हळुवार बनते. एखादा क्षुद्र, सामान्य अनुभवही त्याना व्यथित करतो. त्यांच्या धिप्पाड देहामध्ये वसत असलेल्या भावड्या मनाची व्यथा फार थोड्यांनी जाणली. मनुष्यप्राण्याच्या अंगी वसत असलेल्या प्रमादाचेच अनेकांनी भांडवल केले. त्यांच्या एकादशव्रताचा उपहासही अनेकांनी केला. काकासाहेब कालेलकरांनी मात्र मोठ्या कलात्मकतेने व हळुवार चित्ताने लिहिले : "पुंडलीकजींच्या स्वभावातील काही उत्कृष्ट बाजू आणि कित्येक दोष माझ्या नजरेबाहेरच राहिले असतील. कित्येक परोपकारी स्नेही असले नसलेले कितीतरी दोष कानात येऊन सांगतात. पण हा रतीब इतका काही मुबलक असतो की, त्यापैकी काहीच डोक्यात टिकत नाही; पोटात शिरून ते पचवण्याची गोष्ट तर दूरच राहो."

पण समाजाची पचनशक्ति याबाबतीत फार मोठी आहे. आणि तीच तर एक मोठी व्यथा आहे !

● ● ●










अनुक्रमणिका



स्वर, स्पर्श, गंध, रेखा आणि शब्द या बाबतीत वेडा होणारा रसिक. यामुळे यांच्या कथाना केव्हा केव्हा अपूर्व परिमाण निर्माण होते. (पहा दीपावलीत प्रसिद्ध झालेली 'रियाज') 'अजून' चे या अंकातील 'मोटीफ' यांचेच. रसिकतेचे पोषण करण्याकरता वेळ पडल्यास विद्वान होण्याची तयारी, पण विद्वान बनण्याकरिता रसिकता घालवण्यास कदापि तयार होणार नाही–

भास्कर उत्तरवार

१. ठोकळेबाज जीवनातील चैतन्याची एक गोष्ट
२. जेव्हा शब्दाना नाद लागतो—

# ना ते



"असं बोलायलाच हवं का?"

अनुराधा आचवलनी ते शब्द उच्चारले आणि मी क्षणैक चमकलो. वास्तविक असा क्षणैक चमकायला मी काही ऑफिसला नवखा नव्हतो. हाताखालच्या व्यक्तीनं पोटतिडीकीनं काही म्हटलं म्हणून त्यामुळं कामात सूट द्यायला कच्चाही खासच नव्हतो. प्रथम साहेब आणि मग माणूस ह्या वृत्तीमुळं ऑफिसातील हाताखालील लोक माझ्याजवळ दहा पावलांच्या आत पाय टाकायला धजत नसत. एवढं अंतर मी जाणून बुजून ठेवलं होतं. आपण कामांत सूट दिली ती केवळ मनाच्या कमकुवतपणापायी असा कुणाचा ग्रह होऊ नये म्हणून मी नेहमीच जपत असे. त्याचमुळे कुणी अधिक वैयक्तिक सलगी दाखविण्याचा प्रयत्न केलाच तर मी ताडकन् तोडून टाकीत असे.

पण आता आचवलनी माझ्या ह्या धारणेला अनपेक्षित धक्का दिला. क्षणभर मी डळमळलो कितीही क्षुद्र असला तरी अनपेक्षित बसलेला धक्का चटकन् पचवता येत नाही. कसबसं स्वतःला सावरून म्हणालो,

"चुका केल्यात तुम्ही. त्यावर मी काय बोलावं हे सांगण्याचा अधिकार तुम्हाला नाही. एवढ्या भावनाप्रधान होता तर काळजी घ्यायला हवी होती पूर्वीच."

ताडकन् म्हणालो खरा, पण स्वर नेहमीसारखा कडक येऊ शकला नाही. ध्यानी मनी नसताना त्या बाईच्या वाक्याची चपराक बसली होती. माझा ताठा हास्यास्पद ठरला होता.

"तुम्ही जाऊ शकता." असं कसंबसं म्हणून समोरच्या कागदावर लक्ष एकवटण्याचा प्रयत्न करू लागलो.

लक्ष लागेना. आपण आपल्या स्टाफशी प्रमाणाबाहेर तर कडक वागत नाही ना. आपल्या कडकपणानं घाबरून ते कामं नीट करीत असतील पण व्यक्ति ह्या नात्यानं त्यांच्या मनात आपल्याबद्दल तिरस्कार तर नसेल ना असा कधी नव्हे तो विचार मनात येऊन अस्वस्थ होऊन गेलो.





अनुक्रमणिका

**घरी जाण्यापूर्वी सहज टपाल चाळलं तर त्यात मिसेस् आचवलांच्या बदलीचा हुकूम. मग मगाशी आचवल-बाईंनी चहा दिला तो याच्याचसाठी? त्या अशा कशा वागू शकतात? याचा अर्थ तरी काय?.... अर्थ तरी काय?**

संध्याकाळी ऑफिस सुटायच्या पूर्वी मी आचवलना बोलावून घेतलं. त्या आल्या तशी खुर्चीकडे खूण करून म्हणालो,

"बसा."

त्या बसल्या नाही. संकोच किंवा भीति वाटत असेल, असं वाटलं. पण त्यांच्या चेहऱ्यावर त्याचा मुळी लवलेश नव्हता. वाटचाला आलेलं टळत नाही ह्याची खात्री झाल्यावर एखादी व्यक्ति निर्भय बनावी तसं काहीसं त्यांच्या चेहऱ्यावर प्रतीत होत होतं.

"मला बोलावलत?"

"होय. बसा. मला काही बोलायचय् तुमच्याशी."

त्या बसल्या.

"हे बघा, मी मघा जे काही म्हणालो त्याचं वाईट मानू नका. मी बोलतो ते कामाबद्दल. तुमच्यातल्या व्यक्तित्वाचा अपमान करण्याचा हेतू नसतो माझा."

"हेच सांगायला बोलावलत का मला?"

"होय. आणि ते तुम्ही ऐकून घ्यावं अशी इच्छा आहे माझी."

त्या निर्विकार बसून राहिल्या.

आपल्या बोलण्याला त्यांनी एवढ्या थंडपणानं घ्यावं हे मला आवडलं नाही. पण तरीहि पुढं म्हणालो,

"तुम्हाला बोलून घ्यावं असं मला वाटतं, असं नाही. माझ्यावरहि काही जबाबदाऱ्या आहेत. मलाहि कुणी विचारणारे असतात, ह्याची तुम्हाला जाणीव रहावी अशी अपेक्षा असते माझी."

त्या थंडच होत्या.

"ऐकता आहात ना?"

"होय."

"हे बघा आचवल, तुमची वागण्याची ही पद्धत मला फारशी आवडत नाही. एखादी गोष्ट आवडली नाही तर स्पष्ट बोलावं माणसानं, पण कुणी कळकळीनं बोलत असता थंडपणानं त्याकडे दुर्लक्ष करणं फारसं बरं नाही; निदान मला तरी ते आवडत नाही."

त्यानी प्रथमच डोकं वर केलं. मग संथ सुरात त्या म्हणाल्या,

"आम्ही पण माणसंच आहोत की! तुमच्यावर जबाबदाऱ्यांची जाणीव आहे म्हणूनच आम्ही एवढं काम करतो. खरं म्हणजे इथलं कामच मुळी शक्तीच्या बाहेरचं आहे. एकीकडून कामाचा पडणारा ताण आणि दुसरीकडून तुमची धास्ती ह्या कचाट्यात सापडलोय् आम्ही. दुःख असं की तुम्ही कामासाठी आमच्यावर रागावता हे आम्हाला माहित आहे. तुम्ही मुळातच वाईट स्वभावाचे असता तर हा गृहस्थच मुळी तसा, असं समजून दुर्लक्ष केलं असतं. पण तुमचा चांगला स्वभाव आड येतो आणि मग नुसती खंत करीत बसावं लागतं."

मला हे एकदम नवीन होतं. माझ्या स्वभावापायी स्टाफच्या मनात माझ्याबद्दल आकस असेल ह्या आजपर्यंतच्या माझ्या गृहिताला आज पहिल्यांदाच तडा जात होता. आणि त्यातून सावरायला नाही म्हटलं तरी जरा प्रयत्न करावा लागलाच. मग कसावसा म्हणालो,

"अप्रत्यक्ष का होईना स्तुति नकोय् मला. माझ्या दुर्गुणांची मला जाणीव आहे."

"स्तुति करण्याची मलाहि संवय नाही. खरं ते बोलले. तुम्हाला आवडावं अशी अपेक्षाहि नव्हती माझी."

त्याच्या सुरातला निश्चयीपणा चाटून गेला. त्यांच्याविषयी आदर वाटायला लागला. स्वर बदलून म्हणालो,

"मला आवडलं तुमचं बोलणं. धीट माणसं आवडतात मला."

त्यानी चटकन् माझ्याकडे बघितलं.

"अधिक स्तुति करू नका. आवडत नाही मला ते. माझ्या दुर्गुणांची मलाहि जाणीव आहे."

मी हसलो.

"माझे शब्द माझ्यावरच उलटविलेत की!"

"मी जाऊ आता?"

त्यानी पुढील संभाषण तोडलं हे लक्षात आलं. काही बोलायला तोंड उघडणार तेवढ्यात त्या निघून सुद्धा गेल्या होत्या.

पुन्हा एकदा चपराक बसल्यासारखी झाली.

ह्या प्रसंगानंतर मी स्टाफशी वागण्याचा पवित्राच बदलला. कामे उरकायला कडकपणाच आवश्यक नसतो असं वाटायला लागलं होतं. प्रेमानं आणि सहानुभूतीनं वागल्यास स्टाफ अधिक चांगलं काम करतो, कामात जीव ओततो आणि साहेब म्हणतात म्हणून काम करण्यापेक्षा आपलं म्हणून करतो, हे कळून आलं. त्यातूनच आपल्या विषयी त्यांच्या मनात आपण कल्पिल्याप्रमाणे तिरस्कार नाही हीहि सुखद् जाणीव ह्या वागणुकीमागे होती.

शिस्तीच्या नावाखाली स्टाफवर ठेवलेलं दडपण आतापर्यंत माझ्याहि मनावर दडपण निर्माण करीत होतं. ते आता कमी झाल्यामुळं मलाहि मोकळं वाटत होतं. स्वभावात खेळकरपणा आपसूक यायला लागला होता.

एक दिवस शिपायानं माझ्या टेबलावर चहाचा कप आणून ठेवला. अवेळी आलेला चहा बघून नवल वाटलं. आणि तो आचवल-बाईंनी पाठविला असं कळताच अधिकच आश्चर्य वाटलं.

दुपारी त्या माझ्या कॅबिनमध्ये सह्यांचे कागद घेऊन आल्या तेव्हा न राहवून विचारलं,

"आज काही आनंदाचं घडलय् का?"

"होय तुम्ही माणसात आलात!"

मी चमकलो. स्टाफशी सैल झालो असलो तरी एवढं ऐकण्या-इतपत खासच नव्हतो. किंचित् उपहासानं म्हणालो,

"होय का? आणि मला माणसाळणारा रिंग मास्टर कोण?"

"तुम्ही आपला नियम मोडून एका कारकूनाला त्याच्या परीक्षेसाठी रजा दिलीत."

"अस्सं! मग त्यानं चहा द्यायला हवा होता. तुम्ही देण्याचं कारण?"

"कुणीहि दिला तरी एकच. सारे एकाच ऑफिसात काम करतात. साऱ्यांची सुखदुःखं सारखीच."

अधिक न बोलता तो चहा मी पिऊन टाकला. त्यांच्या चेहऱ्यावर समाधान उमटलं असावं असं मनाशी वाटून गेलं.

"ऑफीसात वाहणाऱ्या वाऱ्यानं दिशा घेतलेली दिसते."

"ती पूर्वीहि होती. तुम्हीच वावटळ निर्माण केली होती."

मी चमकलो.

"वरंच स्वातंत्र्य घेताहात बोलण्यात."

"राग आला?"

"राग तर येण्यालायकच बोललात, पण संताप मात्र आला नाही."

"आभार!"

"मी हंसलो, त्यावरहि.

"एकूण आता ऑफीसला गाऱ्हाणं मांडायला चांगलं माध्यम मिळालं म्हणायचं. एरवी कुणी हिंमत केली नसती."

"असंच नाही. कितीहि लपविण्याचा प्रयत्न केला तरी असंतोष लपत नाही. आज ना उद्या तो शब्दरूप घेतोच. मीच कशाला हवी. फार झालं असतं तर कुणीना कुणी बोलायला लागलंच असतं. मी होते म्हणून ते काम माझ्यावर पडलं एवढंच काय ते."

"एवढंच आहे असं नाही वाटत मला."

"वाटायला लागेल."

"असं म्हणून त्या चटकन् चालत्या सुद्धा झाल्या.

★ ★

आचवल कामाच्या बाबतीत फारशा जलद नव्हत्या. कामाचं ओझं फार पडतं ही त्यांची नेहमीची तक्रार ह्या ना त्या स्वरूपात कानावर येतच होती. त्यांच्याकडून येणारे ड्राफ्टस् बहुधा चुकीचे असत. प्रथम बरेचदा सांगून पाहिलं. तेवढ्यापुरती सुधारणा दिसायची. पुन्हा पूर्ववत्. पुढे मलाहि संताप यायला लागला. त्यांचे चुकीचे ड्राफ्टस् सरळ कापून टाकायला लागलो.

एक दिवस असाच कापून टाकलेला ड्राफ्ट घेऊन त्या आल्या.

"आज काल काम करणंच कठीण करून टाकलत तुम्ही. तुम्हाला काय हवं असतं हेच कळेनासं झालय् मला."

"मला वेगळं काही नको असतं. संदर्भांना द्यायची उत्तरं नीट काळजीपूर्वक लिहिलीत तर तुमचे ड्राफ्टस् कापून टाकायची वेळ येणार नाही माझ्यावर.

"माझ्या बुद्धीला पेलेल एवढं करते."

"साधी पत्रे आणि त्यांची उत्तरे लिहायला पेलणारी बुद्धी कशाला हवी?"

"हे तुम्ही आपल्यावरून बोलता. साऱ्यानाच काही तुमच्या-सारखी बुद्धी दिली नसते ईश्वरानं."

"हे बघा, ईश्वरानं मला कशी बुद्धी दिली आणि तुम्हाला कशी ह्यावर वाद कशाला? माझं मत विचाराल तर तुम्ही मंदबुद्धीच्या आहात हे मानायला तयार नाही मी. तुम्ही ज्या पद्धतीनं बोलता तेवढं चटक मंदबुद्धीचा माणूस बोलू शकणार नाही."

"मग मी चुका मुद्दाम करते असं सुचवायचय् तुम्हाला?"

मी त्यावर हंसलो,

"अडचणीत टाकलत तुम्ही मला. खरं सांगू, तुम्ही नुसत्याच बुद्धीमान नाहीत, हुशार पण आहात! पण माझ्यापुरतं सांगायचं झालं तर मला असली बोलण्याची पद्धत रुचत नाही."

"कसली पद्धत?"

"पुन्हा तेच. ही असली स्वतःकडे वारंवार कमीपणा घ्यायची. स्वतःबद्दल खात्री असावी माणसाला."

"माझ्यापुरतं सांगायचं झालं तर स्वतःचं कमीपण पत्करूनच बोलावं माणसानं. स्वतःबद्दल अवास्तव कल्पना करून घ्यायची आणि एखादे वेळी हंसू करून घ्यायचं. त्यापेक्षा कमीपणच श्रेयस्कर नाही का?"

आणि त्या स्वतःशीच हंसल्या. चेहऱ्यावर स्पष्टपणानं मिस्किल-पणा उमटला होता.

"चांगल्याच हुशार आहात की!"

"हरभऱ्याची झाडं फार झालीत; नाही? पण त्यांच्या खांद्या फार ठिसूळ असतात हो!"

मला हंसू आवरेना. दर वेळी त्या मार्मिकपणानं माझ्यावरच मात करीत होत्या.

अखेर मीच म्हणालो,

"हे बघा, तुम्ही ड्राफ्टस् लिहायचे, ते मी कापून टाकायचे आणि ते तुम्ही पुन्हा लिहायचे, त्यापेक्षा तुम्हाला कठीण वाटलं की सरळ ती फाईल माझ्याकडे घेऊन येत चला. मीच तो ड्राफ्ट डिक्टेट करून टाकीन."

त्यांच्या चेहऱ्यावर उजाळा निथळून आल्याचं वाटलं. पण दुसऱ्याच क्षणी त्या म्हणाल्या,

"पण तुम्ही सारखे कामात गुंतलेले असता. तुमचा माझ्या-साठी खोळंबा नाही का होणार?"

त्यांचा प्रश्न उत्तराची अपेक्षा धरणारा नव्हता हे मला माहित होतं; म्हणालो,

"तुमचं काम ते ऑफिसचा मुख्य अधिकारी ह्या नात्यानं माझंच आहे. तुम्ही केवळ मदतीस असता. अखेर माझं काम मीच करणार ना? खोळंबा कसला त्यात?"

"असं म्हणून कसं चालेल? माझीहि काही जबाबदारी असतेच की नाही. मिळणाऱ्या पगाराला इमान राखावं माणसानं."

"आता मात्र संकोचण्याची पाळी आणलीत माझ्यावर. जे मी म्हणायचं ते तुम्ही म्हणू लागलात की!"

त्या मोकळेपणानं हंसल्या. "तुम्ही माणसात आलात ह्याचा हा दुसरा पुरावा!"

मला मुळीच राग आला नाही.

हळूहळू माझ्या ऑफिसच्या कामाची वाटणीच बदलत गेली. संदर्भ न तुंबता निघू लागले. हाताखालचा स्टाफ काम मन लावून करू लागला. काही कळलं नाही तर प्रथम भीत भीत विचारायला येत. मग भीड चेपली. पुढं पुढं तर कसलीहि अडचण आली, की मला विचारल्याशिवाय ऑफिसचं पाऊलच पुढे पडेना. काम व्यवस्थित पार पडू लागलं. सर्वत्र स्वच्छ वातावरण उमटायला लागलं.

ह्या साऱ्या गोष्टीचं श्रेय आचवलना द्यायला हवं होतं. माझ्या आतापर्यंत चूक ठरलेल्या कल्पनातून बाहेर काढून त्यानी माझ्यात एक समंजस आणि सहानूभूति असलेला अधिकारी निर्माण केला होता. सहानुभूति काय चमत्कार करू शकते ह्याचं प्रत्यंतर आणून दिलं होतं.

एखादे वेळी हे त्याना बोलून दाखवावं असं वाटत होतं. पण त्यावर त्यांची प्रतिक्रिया काय होणार हे मला पुरतं माहित होतं. व्यर्थ शब्दसोस होईल आणि कशाला तोंड उघडलं असं वाटायला लागेल, म्हणून मी मोह आंवरीत आलो. कुणाला रजा हवी असली, कुणाला लवकर जायचं असलं किंवा कुणाला कामात सूट हवी असली तर त्याचं सूतोवाच आचवलकडून कसं होतं आणि आपणहि त्यांची रदबदली मुकाट्यानं कशी स्वीकारतो हे तिऱ्हाईतासारखं पाहत राहिलो. मला त्यात एक प्रकारचा अननुभूत आनंद होत होता.

पण एक दिवस आपलं हे सारं चुकत तर नाही ना असं वाटण्यालायक घडलं आणि मी अस्वस्थ होऊन गेलो.

त्या दिवशी काही महत्वाची कामे तातडीनीच उरकायची असल्यामुळं सर्व स्टाफला उशीरा बसायला सांगितलं होतं. कामाचं महत्व जाणून कुणी जाणार नाही, किमानपक्षी माझी अवज्ञा तरी करायला कुणी धजावणार नाही, अशी खात्री असल्या-मुळं मीहि अधिक चौकशी न करता स्वतः उशीर होईपर्यंत बसून राहिलो.

काम आटोपल्यावर घरी जायच्यापूर्वी सहज चौकशी केली. कळलं की आचवलबाई सोडून सारे काम संपेपर्यंत बसले होते. ऑफिसची वेळ संपताक्षणीच आचवलबाई उठून निघून गेल्या होत्या.

मला धक्काच बसला. संतापहि आला.

दुसऱ्या दिवशी पहिल्यांदा त्याना बोलावून त्याबद्दल विचारलं. महत्वाचंच काम होतं तर मी जाण्यास अडथळा केला नसता, पण असं न सांगता निघून जाणं शोभतं का असा प्रश्नहि केला.

"ऑफीसची वेळ संपल्यानंतर जायलाच हवं मला!"

"कुणाला हौस असते का उशीरा बसण्याची ? आणि जायच्या-



## नेणियला जीव

नेणियला जीव । संगत सुखाची
सम साधायाची । नाही झाली –
अमापाचे पीक । दुष्काळी नासले
काय राहियेले । सांगो नये—
रिते भोग आले । भोगोनिया गेले
हाती राहिलेले । मोजू काय —
मागता मिळाले । वावदूक जिणे
प्रश्न उत्तरोगे । घडे काय —
आस खंत लोभ । सुस्तावली जाग
सावलीचे रोग । सांगू काय —
पावलात वेगा घेता बळी झालो
चालोनिया धालो । दोन पाय —
कासया अस्थीत । सांठवले रोग
जिभेचे सवंग । सोंग झाले —
आता संगतीला । आंचावली आग
आळसला वेग । पायी आहे —

—भास्कर उत्तरवार

पूर्वी परवानगी घ्यायला काही विघडलं होतं ?"

"विघडण्याचा प्रश्नच कुठाय्? काही झालं तरी उशीरा थांवणार नाही मी!"

मला राग आला.

असल्या उत्तराची अपेक्षा नव्हती मला तुमच्याकडून. सारे गेले असते तरी पत्करलं असतं मी. पण तुम्ही जायला नको होतं."

"ह्याला काही अर्थ नाही. न सांगता गेले ह्यावद्दल दोष द्या मला. पण असल्या अपेक्षांची लादणी नको माझ्यावर."

"म्हणजे?"

"साहेव ह्या नात्यानं तुम्ही वाटेल ते वोला की! पण वैय-क्तिक मतं ऑफिसमध्ये कशाला? आवडत नाही मला ते!"

मी सर्द झालो. त्यांच्यावद्दल ज्या कल्पना मी मनाशी गेल्या कित्येक दिवसाच्या त्यांच्या वागणुकीवरून वांधल्या होत्या, त्या एक टिचकीने त्या एवढ्या सहजासहजी उडवून लावतील ह्याची कल्पनाच केली नव्हती मी. मनात शरमून गेलो. आणि स्वतःवर चिडलोसुद्धा.

"ऑल राईट! आय फील सो सॉरी. साहेव आणि कारकून हे नातं विसरलोच होतो मी."

माझ्या स्वरातला कडवेपणा त्याना झोंवला आसावा. त्यांचा चेहरा एकदम पडल्यासारखा झाला. हताश स्वरात त्या म्हणाल्या, "छान! नको ते घडलंच. मला तसं सुचवायचं नव्हतं. असं वोलायला लागलात तुम्ही म्हणजे भीति वाटायला लागते. त्या-पेक्षा वोलणंच नको वाई!"

मी पुन्हा गोंधळलो. म्हणायचं तरी काय ह्या वाईला. त्रासिकपणा वाटायला लागला. फाईलमध्ये उगाच डोकं खुपसून वसलो. पायाखालची वाळू अचानक सुळकन् घसरुन गेल्यासारखं वाटूं लागलं.

अस्वस्थ वाटायला लागलं. जे घडत होतं ते योग्य की अयोग्य ह्याचा मेळच लागेना. आपण आपल्या मर्यादा तर ओलांडीत नाही ना, अभावितपणे नको त्या गोष्टीच्या आहारी तर जात नाही ना असे कडवट विचार सतत येत होते. ऑफीसच्या स्टाफला तिऱ्हाईतासारखं वागवणं सोपं असतं, पण वैयक्तिक जिव्हाळा निर्माण झाल्यानंतर क्षुल्लक वागण्यानंहि केवढी घालमेल निर्माण होऊन जाते ह्याचा नव्यानं अनुभव येत होता. एरवी कामात चुका झाल्यावर स्टाफला डाफरणं कठीण नसतं, पण स्वतः-वद्दलच डळमळीतपणा वाटायला लागला तर तोल ठेवून दम भरणं कठीण आहे हे कळून मी स्वतःच्या कमकुवतपणावर संता-पलो. एका साध्या कारकून वाईनं आपल्याला आपल्या कमकुवत-पणाची एवढी परखड जाणीव करून द्यावी हा विचारच असह्य व्हायला लागला.

वास्तविक आचवलांचा स्वभाव आणि वागण्याच्या पद्धती-नंच मी त्यांच्याशी व्यक्तिगत पद्धतीनं वोललो होतो. मग त्यानी असं चमत्कारिक भासेल इतक्या तुटकपणानं आपल्याला कां तोडावं ?

संगती लागेना.

दुपारी कसलीशी फाईल घेऊन त्या आल्या.

त्या केसमध्ये पुढे काय कारवाई करायची हे नेहमीसारखं विचारायला. त्यांच्या वोलण्यात काही वेळेपूर्वी काही अस्वस्थ करणारं घडलं आहे ह्याचा लवलेशहि नव्हता. ह्या गोष्टीची मला

चीड आली. आल्या आल्या त्याना सरळ हेडक्लार्ककडे जायला सांगितलं.

त्या क्षणभर थांवल्या. मग सरळ पुढील खुर्चीवर वसल्या.

"एकूण राग आलेला दिसतो."

मी डोकं वर उचललं नाही.

"तुम्ही कितीहि कामात गर्क असल्याचं सोंग केलं तरी मी इथून जाणार नाही!"

मी चढत्या सुरात म्हणालो,

"मग वसून रहा! मला वेळ नाही!"

"एवढं रागवायला काय झालं?"

मी तोंड उघडलं नाही. काही वोललो तरी त्या वाजू आपल्या अंगावर उलटवतील असा विचार मनात येऊन गेला. आपल्या रागाचं सोंगहि त्यांच्यापुढं फारसं टिकणार नाही हेहि माहित होतं.

"हे वघा, तुम्हाला सांगायचं नसेल तर सांगू नका, पण राग व्यक्त करण्याची ही कसली तऱ्हा?"

"मी कसं वागावं आणि काय वोलावं हे तुम्ही सांगायला नको."

"हे जुनं झालय्. एकदा सोडून अनेकदा म्हणून झालय् आतापर्यंत."

मी तोंड मिटलं. अधिक वोलण्यात अर्थ नव्हता. काही क्षण स्तब्धतेचे गेले. मग त्याच म्हणाल्या,

"माझ्यावर कृपा करायची असेल तर तुम्ही वोलून घ्या हवं तेवढं. पण असं न वोलून संताप व्यक्त करू नका."

"तुम्ही मला वागणंच कठीण करुन सोडलत. वोलावं तिकडूनहि कठीण, न वोलावं तिकडूनहि कठीण. अशानं ह्या ऑफीसात काम करणं अशक्य होईल मला."

"तुम्ही काही झालं तरी वॉस आहात. तुम्हाला आमच्यासारख्या साध्या कारकुनानी काय सांगायचं. पण एक विनवते, कृपा करून आमची अंतःकरणं दुखतील असं वागू नका."

व्हायचं ते झालं. पुन्हा एकदा त्यानी मात केली. हताश झालो आणि त्यानी आणलेल्या फाईलमध्ये काय करायचं ते समजावून दिलं. त्यांच्या अट्टाहासापायी ड्राफ्ट डिक्टेटसुद्धा केला.

त्यांच्या चेहऱ्यावर स्वच्छ समाधान उमटून उठलं. माझा राग केव्हाच विरघळून गेला होता. जायच्यापूर्वी त्याना म्हणालो,

"खरंच कमाल आहे तुमची, आचवल."

"आमची कसली; कमाल तुमची."

"ओफ्! आता कृपा करून असलं वोलणं थांववा. आणि नसेल थांववायचं तर कृपा करून इथनं जा!"

"तुमचा राग गेला आहे. आता नक्कीच जायला हवं." त्या उठल्या आणि सरळ निघून गेल्या.

त्यांच्यावर रागावण्यात सुद्धा अर्थ नव्हता हेच खरं!

आणि ह्याचं प्रत्यंतर पुढं अनेकदा आलं. इतरांशी वागण्या-वोलण्यात सहानुभूति ठेऊनसुद्धा अखेर ऑफीसचा मी मुख्य अधिकारी आहे ह्याचा विसर न पडू देणारा मी आचवलांशी मात्र एक कारकून एवढ्या एका नात्यानंच वागत नव्हतो. एक मानवाईक

## धुंदी

अशांत दर्पण उभी सावली
नेत्रकळाना भारी
वलये मुखरित फुटली वक्षी
पक्षीगणांची यारी.
झिरझिर चंद्रा तोडीत कक्षा
फेक संचिता सारी
आज चालला राजसूय हय
श्यामकर्ण जरतारी.
आरसलेली बिंबे कवळीत
लाट धावली अंगी
जलाशयाची मंद्र संपदा
गंधित झाली संगी.
अगोड गोडी गुलाबलेली
अंतरमय बंदी
निरामयाच्या सुटल्या गांठी
जवळिक झाली छंदी.
कांठावरती धुंद सारजा
काळिज तोलुन ठेली
अन्वय लावुन अंधारामधि
पर्णसावली दडली —

—भास्कर उत्तरवार



व्यक्ति ह्या नात्यानंच त्यांच्याकडे वघत राहिलो. मी कितीहि आणि कुणावरहि संतापलेलो असलो तरी मला मूळपदावर हंसत हंसत आणण्याची त्यांची पद्धत मला आवडू लागली होती. आपल्या अधिकाऱ्यावरहि अधिकार गाजवणारी ही व्यक्ति सामान्य नाही हे कळून आलं होतं. त्यांच्या कामात होणाऱ्या चुका, निष्काळजी स्वभाव, ऑफीस सुटताच वेदरकारपणानं निघून जाणं आणि केव्हांहि महत्वाचं काम असलं तरी वैयक्तिक कामापुढं त्याला कमी लेखणं हे सारे न आवडणारे दुर्गुणसुद्धा त्यांच्या ह्या एका स्वभावापायी चालवून घ्यायला लागलो. एक जवळीक निर्माण झाली आणि माझ्यातल्या माणसानं अधिकाऱ्याला वाजूला सारून टाकलं.

कधी कधी उत्साहात येऊन त्या अश्या लगवगीनं कामं उरकून टाकीत की ह्या वाई संथ आहेत हे कुणाला सांगून सुद्धा खरं वाटू नये.

असले परस्परविरोधी गुण त्यांच्यात कां असा विचार मनात यायचा. त्यामागची कारणपरंपरा शोधावी असं वाटायचं. पण तो विचार मनात टिकू दिला नाही. कुणाच्या वैयक्तिक जीवनाशी जवळीक दाखविण्याचा विचार अधिकारी ह्या नात्यानं मनात आणणं इष्ट वाटत नव्हतं. ते त्यानाहि आवडलं नसतं हे मला माहित होतं. आपण कितीहि जवळीकीनं वागलो तरी अखेर अधिकारी ह्या नात्यानं स्वतःवर वंधनं घालून ठेवली तरच ऑफिसचं वातावरण





अनुक्रमणिका

बरं राहतं हे अनुभवानं कळलं होतं. एक दोनदा सहज विचारलेल्या प्रश्नांना त्यानी तुटक उत्तरं दिली होती आणि माझ्या दृष्टीनं ते पुरेसं होतं.

एकदा मी उत्साहात होतो. काही तरी आनंदाची घटना घडली होती. नाही तरी ऑफीसात सात-आठ तास सहवासात असणाऱ्या स्टाफला असले वैयक्तिक आनंद सांगावेसे वाटतात. आपल्या साहेबांना आनंद झालेला दिसल्यास त्याचे पडसाद ऑफिसमध्ये उमटल्याशिवाय राहत नाहीत; ह्याचा अनुभव होता मला. एक दोन जणांना सांगितलं आणि थोड्या वेळात ऑफीसात त्याची चर्चा सुरू झाली.

त्यानंतर कसली तरी कामं सतत येत राहिली आणि कामाच्या गर्दीत तो विषय विसरूनहि गेलो.

ऑफीस संपायच्या वेळी कॅबिनमध्ये चहा आला. कुणी पाठविला ह्याची चौकशी करणार तोच आचवल कॅबिनमध्ये आल्या.

"कॉंग्रॅच्युलेशन्स"

"कशाबद्दल?"

"सकाळच्या बातमीबद्दल."

"ओ ! थँक्स्. उशीरा का होईना पोच मिळाली."

त्यांचा चेहरा क्षणैक काळवंडल्यासारखा झाला.

"एवढी आनंदाची बातमी साऱ्या ऑफीसला फक्त मला वगळून सांगितलीत ना ?"

त्यांच्या बोलण्याचा रोख माझ्या लक्षात आला. "मुद्दामच सांगितली नाही. वैयक्तिक बाबी तुम्हाला सांगू नये असं ठरविलं होतं मी. वैयक्तिक बाबतीत अधिक सेन्सीवल आहे मी. तुम्हाला कौतुकानं सांगायला जावं आणि तुम्ही ते तोडून टाकावं हे आवडलं नसतं मला."

"थँक्स् ! स्पष्ट सांगितल्याबद्दल."

"आभार मानायला नको. वस्तुस्थिति सांगितली."

"मला असलं साहित्यिक बोलणं कळत नाही. आम्ही आपली साधी माणसं."



मी चटकन् म्हणालो,

"हे बघा, तुम्ही काय बोलणार हे माहित आहे मला. पण असं बोलण्याची पद्धत टाळली तर फार बरं होईल."

मी क्षणभर अस्वस्थ झालो. मग म्हणालो,

"तुम्ही असल्या प्रकारच्या बोलण्यानं मला दुखवता हे कसं कळत नाही तुम्हाला, आचवल. मी तुम्हाला हाताखालच्या अनेक कारकुनांपैकी एक एवढंच मानत नाही. पण कधी कधी तुम्ही एवढं चमत्कारिक आणि विसंगतीपूर्ण वागता की तुमच्याशी चांगुलपणानं वागण्याचा कुठला मूर्खपणा करून बसलो असं होऊन जातं मला. तुम्ही एखादी चांगली गोष्ट केली म्हणून कौतुक करावं तेहि तुम्ही झटकून टाकता. कौतुक ऐकण्याची संवयच नाही का तुम्हाला ?"

त्या क्षणभर स्तब्ध झाल्या. मग एकदम म्हणाल्या, "तो चहा घेऊन टाका. गार व्हायला लागलाय्."

मी चिडलो.

"ते मलाहि दिसतं. आणि तुम्ही असं काहीतरी बोलणार हेहि मला अगोदरच. . . . ."

"माहित होतं ना ?"

"होय."

"मग विचारायचा खटाटोप तरी कशाला केलात."

मी पुन्हा त्रासलो. चूप बसलो. थोड्या वेळानं त्याच म्हणाल्या,

"कौतुकाबद्दल म्हणालात तुम्ही. कौतुक कुणाला नको असतं. घरी ह्यानी कौतुक केलं, आईनं केलं की मूठभर मांस चढतं अंगावर. दुसऱ्या कुणी केलं तर ते कौतुकच वाटत नाही. कृत्रिमतेचा वास येतो. . . . ."

"दुसऱ्यानी केलेलं कौतुक कृत्रिमच असावं असं आहे का ?"

"नसेल. पण ते स्वीकारायची इच्छाच होत नाही. रक्ताची नसली तरी निर्माण झालेली नाती मोलाची वाटतात. कृत्रिमतेचा संशय ती नासवून टाकू नये म्हणून जपते. . ."

त्या क्षणभर थांबल्या. काळवंडलेला चेहरा उजळून काढायचा प्रयत्न करीत म्हणाल्या,

"तुम्हाला चमत्कारिक वाटत असेल माझं वागणं. पण खरं सांगू ? माझी चाकोरी मोडवत नाही मला. देहानं ऑफीसात असले तरी अंतःकरणानं घरीच असते. पाहुणपणाला जावं तसं व्ययस्थासारखं ऑफीसात जाणं. सारं लक्ष असतं संसारात. ह्यातच सारं येतं."

त्या थांबल्या. क्षणभर अलिप्ततेचा भाव त्यांच्या चेहऱ्यावर चमकून गेला. मग त्या एकदम म्हणाल्या,

"इश्श ! कसला विषय निघाला. तुमचा चहा गार होत चालला की ! हे असंच तुमचं. होईल हे सारं नंतर. तो चहा घेऊन टाका बघू चटकन् !"

समोरचा थंड बेचव चहा मी एका घोटात पिऊन टाकला.

संध्याकाळी घरी जायच्यापूर्वी सहज टपाल चाळलं. आचवलांच्या बदलीचा हुकूम आलेला होता.

मी चमकून शिपायाकडे चौकशी केली. कळलं संध्याकाळी कॅबिनमध्ये आलेला चहा आचवलबाईनीच दिला होता !

●●●

अनुक्रमणिका








## टेकडी अश्रू गाळते आहे–

टेकडी अश्रू गाळते आहे
क्षितीजाच्या क्रूसावर
जिथे सूर्य खिळून पडला आहे . . .
येणाऱ्या रात्रीच्या
काळावलेल्या प्रकाशाचे
पोलादी काटे
थोपू बघते आहे संध्याकाळ
संधिप्रकाशातील
उरलेले रक्तकण
मनगटात गोळा करून . . .
रात्रीच्या उर्वशीचे उत्तरीय
हाती धरून
दिवस धडपडतो आहे
काळाची गिळगिळीत मासळी
झेलायला
पुरुरव्याच्या आशेने . . .
घामेजली गाय
चिखलात रुतलेले पाय
नजरेत घेऊन
आर्जवते आहे
पाठीवरच्या श्वापदाला
बघत आशेच्या
अपारदर्शक काचेतून. . .
अश्वत्थाम्याच्या डोक्यातून
गळणारे काळे रक्त
थांबवू बघतो आहे
त्याचा चिरंजीव आशीर्वाद. . .
भविष्याचा एक कण
लटकला आहे
काळाच्या तारेवर
पावसाच्या कातरलेल्या थेंबासारखा
पडण्याची वाट बघत
आशेच्या हिरवळीवर . . .
घडणारे घडले आहे
घडणारे घडते आहे
घडणारे घडणार आहे
पण टेकडी अश्रू ढाळते आहे
निदान
त्या ओलाव्याने तरी
क्रूसाचे काटे फुलतील
ह्या आशेने !

–भास्कर उत्तरवार





अनुक्रमणिका








आव नाही. भाव भरपूर आहे. कल्पकता आहे. काव्य आहे. वाणीचे लोण बुद्धि-हृदया-पर्यंत लिलया पोहोचते. एवढे असून लेखनाचे मौन सातत्यपूर्ण बनत आहे. हा खरा धोका. 'अजून'-मुळे तो तूर्त टळला आहे— प्रसिद्ध साहित्यः—'मेनका' काव्य-संग्रह.

**१. असा कथाकार होणे नाही**

**२. मुक्त झाला छंद**

'वा : काय कथा आहे!' असे उद्गार काढावयास लावणारे मराठवाड्याचे प्रसिद्ध ललित लेखक

# कै. बी. रघुनाथ

## यांचे कथाविश्व



**बी.** रघुनाथ यानी काव्य, कादंबरी, लघुनिबंध हे वाङ्मयप्रकार यशस्वीपणे हाताळले असले तरी कथा लेखक म्हणूनच त्यांची विशेष ख्याति आहे. मराठी कथेच्या क्षेत्रातील त्यांची कामगिरी, विस्ताराच्या व विकासाच्या या दोन्ही दृष्टीनी महत्वाची आहे. ज्या स्वरूपाच्या लेखकावर आज अनुकूल–प्रतिकूल लेखनाचा गदारोळ उडाला आहे त्या लेखनाची व बी. रघुनाथ यांच्या लेखनाची जातकुळी एकच आहे. आज चर्चाविषय झालेल्या पुस्तकांच्या आधारावर बी. रघुनाथ यांचा स्वयंभू मोठेपणा अधिक मोठा करून दाखवावा अशातला भाग नाही. त्यानी चित्रित केलेल्या कथातील जीवन व आजच्या वादग्रस्त कथातील जीवन यात तसा फारसा फरक नाही. फरक ज्या विशिष्ट परिस्थितीत त्या जीवनाचा उद्भव झाला ती परिस्थिती व तदनुरूप अभिव्यक्तीत दिसून येणारा वेगळेपणा एवढ्यापुरताच काय तो आहे. अर्थात् साहित्य–निर्मितीच्या क्षेत्रात या गोष्टीना अनन्य महत्त्व आहे हे विसरून चालणार नाही. परन्तु बी. रघुनाथांच्या साहित्यात झालेलं वकाळकंगालांचं, पतितांचं, चारित्र्यशून्यांचं व अर्थकामैकमय जीवन जगणारांचं जे विलक्षण बोलकं व विदारक चित्रण झालेलं आहे त्याची दखल जाणकार अभ्यासकानी देखील घेतलेली दिसत नाही. आजच्या वादग्रस्त कथेशी बी. रघुनाथांच्या कथेचं नातं जुळविण्यात, बी. रघुनाथांच्या कथेतून तिची परिणती झाली हे सांगण्याचा वा सुचविण्याचा हेतू नाही. आजची कथा, औद्योगिक, यांत्रिक नागर पार्श्वभूमीवर निर्माण झालेल्या गलिच्छ वस्त्यांतून, त्यातील संस्कारहीन, दिशाहीन, अनैतिक वातावरणातून उद्भवलेली आहे. बी. रघुनाथांच्या कथाना ही पार्श्वभूमि नसली तरी त्यातून चित्रित झालेल्या जीवनाचं या वातावरणाशी पुष्कळच साम्य आहे.

स्थूलाकडून सूक्ष्माकडे जाणं हे साहित्य विकासाचं एक प्रमुख



अनुक्रमणिका







लक्षण मानलं जातं. जुन्या कथेहून नव्या कथेचा वेगळेपणा, तिचं सामर्थ्य दाखविताना याचा आवर्जून उल्लेख केला जातो. या सूक्ष्मतेवरोबरच कथेच्या कक्षा व जाणिवा वाढविण्याचा, तिला एखाद्या नव्या जीवनाचा परिचय करून देण्याचा, तिची अभिव्यक्ति अधिक वास्तव व अर्थगर्भ करण्याचा प्रयत्न झाला असेल तर तोही एकापरीनं कथा पुढे नेण्याचाच प्रयत्न आहे याचीही दखल घ्यायला हवी. बी. रघुनाथांच्या कथातून मराठी कथेला सर्वस्वी अपरिचित असलेल्या एका नव्या जीवनाचं दर्शन घडतं. हे जीवन केवळ त्याच्या प्रादेशिक वैशिष्ट्यामुळेच वेगळे आहे असे नसून समाजाच्या ज्या अधःस्तरातील हे जीवन आहे, त्यामुळेही ते निराळे आहे. समाजाचा हा खालचा थर मराठीपुरता तरी अलक्षित व अस्पृश्यच होता. परन्तु प्रादेशिक व ग्रामीण कथालेखक असा गवगवा झाल्यामुळे त्यांच्या कथांच्या या वेगळेपणाची वूज फारशी राखली गेली नाही. मराठी कथा त्यानी अधिक समृद्ध केली असे म्हणताना त्यानी रंगविलेल्या त्यक्त, वहिष्कृत व वासनामय जीवनचित्रणाचा संदर्भ ध्यानात ठेवला पाहिजे. मराठी कथेत हा एक नवाच प्रवाह त्यानी आणून सोडला.

**प्रादेशिकतेच्या अतीत जाणारे चित्रण**

ते ग्रामीण वा प्रादेशिक कथालेखक आहेत हे विधानही तपासलं पाहिजे. माडगूळकर, पाटील, शेळके, यादव, बोराडे हे ज्या अर्थानी ग्रामीण वा प्रादेशिक कथालेखक आहेत, त्या अर्थानी बी. रघुनाथ हे ग्रामीण कथालेखक नव्हेत. त्यांच्या कथांतून मराठवाड्यातील ग्रामीण जीवन, वोराड्यांच्या कथांतून दिसते तसे दिसत नाही. मराठवाड्यातील ग्रामीण बोलीचाही फारसा वापर त्यानी केलेला नाही. खेड्यामधील सामान्य माणसं —शेतकरी-कामकरी, महार-चांभार, सोनार-शिंपी, शेटजी-भटजी, पाटील-पटवारी—यांचं चित्रणही त्यांच्या कथातून नाही. 'नागझरीचे पाटील,' 'ते तिघे आणि ती', 'जनता लिंबे टाकळी,' या कथातून आलेलं ग्रामीण जीवनाचं दर्शन, त्याचा कुठल्या ना कुठल्या प्रकारे शहरी जीवनाशी संबंध आल्यानंतरचे आहे. गावकऱ्यांचं भावजीवन, त्यांची सुखदुःखं, हेवेदावे, इत्यादींचं चित्रण त्यांच्या कथातून नाही. त्याना ग्रामीण कथालेखक म्हणणं म्हणजे ग्रामीण शब्दाचा अर्थ फारच ताणल्यासारखे होईल.

ते तसे प्रादेशिक कथाकारहि नव्हेत. माडगूळकर म्हणजे माणदेश, शेळके म्हणजे वऱ्हाड, पेंडसे म्हणजे कोंकण, तसे बी. रघुनाथ म्हणजे मराठवाडा असे समीकरण मांडता येत नाही. बी. रघुनाथ यानी मराठवाड्यातील जीवनाचेच चित्रण केलेले असले तरी मराठवाडा हा भूप्रदेश त्यांच्या कथाविश्वाचा अविभाज्य घटक नाही. तेथला निसर्ग, डोंगरदऱ्या, झाडझाडोरा, नदीनाले, देवदेवता त्यांच्या कथातून सजीव पात्राप्रमाणे वावरत नाहीत. त्यांच्या कथातील जीवन प्रादेशिक पार्श्वभूमीपासून वेगळं केलं तरी त्याची सजीवता हरपणार नाही. त्यानी मुख्यतः माणसं रंगविली. ती त्या मातीत जन्मलेली असली तरी सर्वच त्या मातीचा वारसा सांगणारी नाहीत. एका कनिष्ठ सरकारी नोकरानं पाहिलेलं, अनुभवलेलं मराठवाड्याच्या एका जिल्ह्याच्या शहराचं वातावरण, त्यातील सर्व वारकाव्यांसह व तपशीलासह त्यानी टिपलं आहे. त्यांचा विशेष हा की कारकुनाच्या चाकोरी-वाहेरचं अलक्षित व उपेक्षित जीवनही त्यानी तेवढ्याच जाणते-पणानं व समरसतेनं न्याहाळलं. समाजातून उठलेली व उठवलेली माणसं, जगावरून ओवाळून टाकलेल्या वाया, वेवारशी संतति, फकीर व मौला, नशावाज व रंडीवाज, फाकेमस्त व भाडखाऊ, क्रूर कर्मे व त्यांचे निरपराध वळी, असे माणसांचे अनेकविध नमुने, त्यांच्या जीवनाच्या सर्व ताण्यावाण्यासह व गुंतागुंतीसह त्यानी पाहिले व मराठी कथेला अपरिचित असलेलं एक नवे जग तिच्या अनुभवकक्षेत आणून सोडलं.

जगणं आणि जुगणं या दोन प्रेरणांभोवतीच फिरणाऱ्या या जीवनाकडे त्यानी मध्यमवर्गीय सोवळेपणानं पाहिलेलं नाही. जे जाणवलं, अनुभवलं ते तितक्याच रोखठोकपणे उघड उघड मांडले आहे. या कथा ज्या काळात लिहिल्या गेल्या तो काळ खालच्या वर्गाचं कल्पनारम्य चित्रण करण्याचा होता. त्यातला नकलादु-पणा व कृत्रिमपणा जाणवायला बराच काळ जावा लागला. माणसाच्या नैसर्गिक प्रकृतिसिद्ध वासना व त्यांचा उपशम करण्याकरिता चाललेली धडपड सर्वांना समान आहे. तिथे उच्चनीच भेद नाही. जिथे दारिद्र्य असेल, संस्कारांचं, शिक्षणाचं परिस्थितीजन्य दुर्भिक्ष्य असेल तिथे तर त्यांच्या तृप्तीकरिता कुठल्याहि सव्यापसव्य मार्गाचा अवलंब केला जातो. त्याना लगामी लावण्याकरिता लागणारं नैतिक वळ अशा समाजातच अभावानेच आढळतं. जे हवसं वाटतं ते हव्या त्या मार्गानं मिळविण्याकडे सर्व शक्ति केंद्रित झालेल्या असतात. 'आहार-निद्राभयमैथुनंच' या वर्तुळात भ्रमणाऱ्यांचं मनाला अस्वस्थ व चकित करणारं सुन्न व बधीर करणारं जीवन बी. रघुनाथ यांच्या कथात पहावयास सापडतं.

**व्यक्तीचा अनुभव, कलात्मक स्वानुभाव**

आपल्या चाळीस वर्षांच्या अल्प आयुष्यात बी. रघुनाथानी ५०–६० कथा लिहिल्या. साहित्यनिर्मितीला त्यानी काव्यलेख-नानं आरंभ केलेला असला तरी त्यांच्या लेखनात काव्यात्म वृत्तीमुळे येणारी प्रतिमाप्रधानता वा भावविवशता नाही. कवीचा संवेदनाशील सहानुभाव मात्र सर्वत्र आढळतो. या सहानुभावामुळेच आपले अनुभवविश्व ते मध्यमवर्गीयांच्या सीमांपलिकडे नेऊ शकले. समाजाच्या खालच्या थरातील जीवन डोळसपणे पाहू शकले. त्या अनुभवात रंगून जाऊन, त्याना अनुरूप अशा आकृतीत वांधू शकले. याकरिता लागणारी कलात्मक उंची व अलिप्तता त्यांच्या जवळ होतीच. या अलिप्ततेमुळेच ठोकळेवाज, सांचे-बंद चित्रण त्यांच्या कथात कुठेच नाही. त्यांच्या कथांतील माणसं ही हाडामाडाची माणसं आहेत. प्रत्येक जण आपलं स्वतंत्र व्यक्तित्व घेऊन जन्माला आलेला आहे. एकाच सामाजिक थरा-





अनुक्रमणिका

तील त्या व्यक्ति असल्या, ठराविक विचार–विकारानी झपाटलेल्या असल्या, तरी त्यांचे चित्रण करताना, त्यांच्या स्वतंत्र–स्वत्वपूर्ण व्यक्तिमत्वाचा लेखकाला विसर पडलेला नाही. यामुळेच ती आपल्या मनावर ठसा उमटवून जातात. त्यांच्या बहुतेक कथा व्यक्तीप्रधान आहेत. बेगम सकीना, शेख मस्तान, काळी राधा या कथा तर त्यांच्या शीर्षकावरूनच उघड उघड तशा दिसतात. पण इतर कथातूनही उल्फत, समिंदर, संपतराव पाटील तान्ही, गुणी, चंचलू, लैला, तानाशा व बानाशा, कस्तुरी, लंगडा लाला अशी अनेक अविस्मरणीय माणसे भेटतात. त्यांच्या प्रतिभेचा सर्जक धर्मच व्यक्ति व घटना यांच्याभोवती रमणारा दिसतो. व्यक्ति व घटनांच्या परस्पर समन्वयातून वा संघर्षातून त्यांच्या कथा घडत जातात. त्यांच्या प्रतिभेच्या या वैशिष्टयामुळेच मानसिक आंदोलने वा संघर्ष, Moods, एकाद्या तरल मनोवृत्तीचे वा भावानुभवाचे पिंजण असा प्रकार त्यांच्या कथात तुरळक दिसतो. त्यानी निर्माण केलेली माणसं ज्या थरातील आहेत, तिथे विचारापेक्षा कृतीवर भर अधिक. त्यांची मानसिक आंदोलने अजमावयाची, ती सुद्धा त्यांच्या कृतींमधून. या घटना वा कृती मांडण्याची वी. रघुनाथ यांची पद्धतीही तशी सरळ व सरधोपट आहे. कथावस्तुतील नाटय प्रभावी व्हावे म्हणून, फ्लॅशबॅक पद्धतीनं कथा सांगणं यासारख्या काही परिचित युक्त्या उपयोजिलेल्या आहेत. त्याहि बुद्धिपुरस्सर योजल्या असतील असे सांगता येत नाही. कथावस्तु मुळातच इतकी जोरकस व प्रभावी आहे की अवांतर युक्त्या-प्रयुक्त्यानी तिला अधिक नीटस नीटनेटकी करण्याची गरजच लेखकाला भासू नये. एखाद्या झपाटलेल्या माणसाने, मांत्रिकाच्या इशाऱ्यावरहुकूम हालचाली कराव्यात तशा या कथावस्तु लेखकाला आपल्यावरोवर खेचून नेत आहेत असं वाटतं. असं असूनही त्यांचं कलावंत मन प्रवाहपतित न होता सदैव सावध असल्यासारखं दिसतं. व म्हणूनच या चित्रणात नाटकीपणा वा आक्रस्ताळेपणा याचा जवळजवळ अभाव आहे. त्यावरोवरच त्या जीवनाबद्दल खोटी सहानुभूति व कणव दाखविण्याचा पोशाखी शिष्टपणा व परोपदेशे पांडित्यहि नाही.



### कथासर्जनाची परिमाणे

या कथातून मुख्यतः व्यक्ति व व्यक्ति, व्यक्ति व परिस्थिती असा संघर्ष चित्रित झालेला असला तरी अशा जडभौतिक वातावरणातच सर्व पात्रे वावरतात असे नाही. क्वचित् समान धर्माच्या सुसंवादी मनाच्या सोबतीनं जरा वरच्या तरल विरल वातावरणात रमणारी मनेही इथे दिसतात. 'मिटलेले आकाश' या संग्रहातील 'आकाश' ही पहिलीच कथा अशीच जरा वरच्या पातळीवरची आहे. या कथेतील 'मी'ची प्रवासाला निघतानाची विशिष्ट मनोवस्था व त्या मनोवस्थेला अनुकूल प्रतिसाद देण्याऱ्या संवादी मनाची सोबत एवढेच या कथेचं कथानक म्हणता येईल. लेखकाची ती विशिष्ट मनोवस्था हैद्राबादेतील साहित्यिक मित्रांच्या सुखद् सहवासात "नवे विचार ऐकून, संस्काराचे पराग व संज्ञांच्या फुलपांखरानी खूप मनभरणी" झाल्यामुळे झालेली आहे. प्रवासाकरिता गाडीत येऊन बसल्यावर डब्यातील घाईगर्दीचं व गोंधळाचं वातावरण, त्याच्या या विशिष्ट मनःस्थितीशी विसंवादी आहे. त्यामुळे "सभोवतालच्या हालचाली नकोशा वाटत होत्या, तळ्यात धड ना पाऊस पडत होता, ना आकाशाचं बिंब चमकत होतं, काहीतरी चमत्कारिक वलयं उत्पन्न होऊन तळापासून पुन्हा वर येत होती". अशा अवस्थेत घरी पोहोचण्याची घाई झाली होती, पण गाडी हलत नव्हती. इतक्यात शिटी झाली व घाईघाईनं कुणाचं तरी सामान व त्यामागोमाग एक कुरवाळी डब्यात चढली. "........ती नुकतीच पुत्रवती झालेली असल्यामुळे तिच्या शरीरातला ताठरपणा लिबलिबीत पण रसाळ झाला होता.....मुसमुस मावळून आता नुसती ओलसर गर्द टवटवी भरली होती." संस्कारांच्या परागानी व संज्ञांच्या फुलपाखरानी मनभरणी झालेल्या मनाला मातृत्वामुळे पूर्णता आलेल्या गर्द टवटवीत मनाची संगत लाभली. या पार्श्वभूमीवर साध्याच गप्पाना व घरगुती चवकशानाही अधिक रंगत व गोडवा आला. शिदोरीतही सहभागी व्हावं लागलं व मग 'तिकडच्या' चवणेबाज खोडी ऐकाव्या लागल्या. लहानगीचं कौतुक झालं. हळू हळू मनं उमलू लागली. एका वेगळ्याच स्नेहाचे व मैत्रीचे रेशमी धागे परस्परात गुंतू लागले. सौहार्दाची लय वाढली व झोपेत खांद्यावर विश्रब्धपणे मान टाकण्याइतपत सलगी आली. या सलगीमागे कुठलीही शारीरिक ओढ वा आकर्षण नाही. पूर्ततेनं व प्रसन्नतेनं नटलेली दोन मने एकत्र येतात, ओळखपाळख, आप्तसंबंध नसलेली, 'यथा काष्ठंच काष्ठंच' प्रमाणे एकत्र आलेली व तशीच दूर जाणारी. पण या मर्यादित कालात या सर्व संबंधांच्या अतीत असणारं, सर्व नात्याहून थोर असं एक नातं ती निर्माण करतात. त्या लेकुरवाळीच्या रूपानं जणू सर्व मानवतेला स्पर्श होतो, मानवाच्या आंतरिक जीवनाचं सूत्र सांपडल्यासारखं होतं व आकाशाप्रमाणेच अवघे विश्व कवळल्याचा भास होतो. वी. रघुनाथांची ही









# पापाचे लेकरू



पापाचे लेकरू – पुण्यात नाहते
सावली रांगते – उन्हामाजी
नक्षत्रांच्या गारा – विरती उन्हात
पाप्याच्या मनात – पुण्य जैसे
आता भोगितो मी – उजेडाचे शाप
अंधाराचे माप – घेऊ कैसे
देते आवंतण – माझे पायतण
हेच गा कारण – चालतो मी
अजून छातीत – काळजाचा घड
डोईखाली धड – अवघडे
उजाडेल तेव्हा – उजाडो बापडे
पायांचे साकडे – त्याचे त्यास

–यशवंत कानिटकर

एक यशस्वी कथा. त्यांच्या इतर कथांहून वेगळी. इतर कथात दिसणारे लुच्चे, लफंगे, कंगाल इथे नाहीत. त्यांच्या स्वार्थाचं व देहस्वी मनाचं इथं चित्रण नाही. तृप्तीची, स्वार्थनिरपेक्ष निरागस वृत्तीची, एक तरल तकाकती आभा या सर्व कथेवर पसरली आहे. पण अशी कथा एखाद दुसरीच. इतर कथांतून अतृप्त, अस्वस्थ व वखवखलेल्या मनांचंच दर्शन घडतं.

कुत्रे या कथेतील, कुरूपतेमुळे कोणालाच नको असलेली, सुखाची ऊब मिळविण्याकरिता धडपडणारी व ते मिळण्याचा संभव दिसताच कुणालाही देह अर्पण करणारी लैला अशा अतृप्तीचं एक भेदक चित्र आहे. कस्टम खात्यात दरमहा १२ रु. तनख्यावर स्त्री उतारूंचं सामान तपासण्याची कामगिरी तिच्याकडे आहे. आपल्या तारुण्यसुलभ भावनांचा कुणावर तरी वर्षाव करावा, कुणाकरिता तरी राबावं, खपावं, संसार मांडावा, आपली कूस उजवावी एवढीच तिची माफक आकांक्षा आहे. यौवनानं उसळणाऱ्या तिच्या मनाला मीलनाची आस लागून राहिली आहे. "पावसाचे टपोरे थेंब आत्मसमर्पणाच्या अनावर आवेगानं तिच्या अंगावर झेप घेऊ लागले कीं, पाण्यात डुंबून पंख फडफडविणाऱ्या पाखरासारखे आपले सपुलक अंग ती आनंदातिशयाने चळवळवीत होती. ते थेंब तिला संजीवक चुंबनाच्या वर्षावासारखे वाटत. पळत्या ढगांची गंमत बघताना तिचा उनाड पदर वाऱ्यावर पोहत असे". तिच्या अशा उचंबळत्या अंतःकरणाला प्रतिसाद मिळत नव्हता. आपली अंतःसृष्टि रसरंगसंपन्न करील असा जोडीदार तिला हवा होता, पण तिची कुरुपता नडत होती. इस्माईल नावाच्या चपराश्यावर तिचं प्रेम बसलं. शादीची आणभाक झाली. पण त्याने दुसरीशीच शादी केली. लैलानं जाब विचारल्यावर "तुझ्यासारख्या वाटगीशी शादी करायला मला जातकुळ आहे की नाही, आणि अशी 'बदसुरतबला' घेऊन मी काय करू?" असा अहेर केला. इस्माईलनंतर डॅनियल नावाच्या ख्रिस्ती माणसाशी तिचं सूत जुळलं व त्यानंतर कादर तिला आवडू लागला. रात्रीच्या गाड्यांकरिता ऑफिसच्या व्हरांड्यात मुक्कामात असताना "तो आपल्याकडे प्रेमाकुल दृष्टीने पाहात आहे, आपल्या स्पर्शातुर देहावरून लाडिकपणे बोटं फिरवीत आहे असं उगीचच तिला वाटू लागलं. तो खरोखरच जवळ आला तेव्हा तिला ते खरं वाटेना. गारठलेल्या फरशीवर त्यांच्या खाकी ड्रेसच्या जाड पितळी गुंड्या तिला रुतत होत्या, तरी तृप्तीची विलक्षण बधिरता चढत चाललेल्या तिच्या देहाला त्याचे काहीच वाटत नव्हते". रात्रीच्या अंधारात तिला जवळ करणारा कादर सकाळी ती लडिवाळपणे जवळ जाताच "चल दूर हट साली, दलिंदर कहींकी, सैतान!" असा तिच्यावर खेकसतो. सहकाऱ्याच्या कानात कुजबुजतो. तिच्या आत्मसमर्पणाची अशी किंमत होते. व तिच्या स्वप्नांचा चक्काचूर होतो. मग तिची गाठ शेख साहेबांशी पडते. त्यांच्या वयस्क दृष्टीत तिला सहानुभाव आढळतो. व एक पावसाळी रात्री ती त्याची शय्यासोबत करते. पण हा क्रम फार दिवस चालत नाही. एका सुप्रभाती शेख साहेबांचा शादीचा जनाना येतो, तिची 'बदचलन, बदसुरत' अशी संभावना होते व शेखसाहेबांशी शादी करण्याचे तिचे मनसुबे हवेतच विरतात. तिला भेटणारे एकजात पुरुष भुकेच्या पोटी कसलेही हाडुक चघळणाऱ्या कुत्र्याच्या जातीचे आहेत. आणि लैला? सुखासाठी हपापलेली, आसुसलेली एक स्त्री आहे की नराला हूल देणारी, भुलविणारी, कामातुर, अर्पणोत्सुक मादी? असा संभ्रम पडतो.

कुत्रे हे प्रतीकात्मक शीर्षक या सर्वच व्यक्तिमनाना अनुरूप आहे असे वाटते. लैलाची तीव्र निराशा व मनोभंग या मध्यवर्ती बिंदुभंवती ही कथा फिरत रहाते. क्षणैक तृप्तीसाठी प्रेमाचे नाटक करणाऱ्या व नंतर तिला लाथाडणाऱ्या पुरुषांच्या लालस मनोवृत्तीच्या व लैलाच्या मोहवश व सुखलोलुप वृत्तीच्या आडव्या-उभ्या धाग्यानी हा पट विणला जातो. त्यातील हे सर्व ताणेबाणे त्या मध्यबिंदुकडेच आपले लक्ष वेधून घेतात. उघडझाप करणाऱ्या दिव्याने एकाच दृश्यावर आपली दृष्टि खिळवून ठेवावी तशी, दारुण उपहास व कुत्सित हेटाळणी यामुळे होणाऱ्या लैलाच्या मनोभंगाची तीव्रता सारखी जाणवत राहते.

कुत्रे कथेतील लैला अशा अपूर्णतेचं, अतृप्तीचं चित्र तर, 'निरुद्ध जीवन'मधील मुमताज म्हणजे भोगविषय, केवळ







'जनता लिंबे टाकळी, 'धर्म बुडत चालला आहे' या कथा अशा उपरोधपूर्ण शैलीत लिहिलेल्या आहेत. राजवट बदलली तरी शासक व शासित हे नातं पूर्वीसारखंच अबाधित आहे. लोकशाही राजवट ही त्याला अपवाद नाही. जुलूम करणारे व जुलमाचे भक्ष्य होणारे बदलले एवढाच काय तो फरक हा 'जनता लिंबे टाकळी' या कथेचा इत्यर्थ. लोकशाही सरकारचा अत्युत्साही भाबडा सेवक, टाकळीची इरसाल जनता व या जनतेनं आयुष्यातून उठवलेली शिक्षक शिक्षिका अशा तिहेरी विणीतून उपरोधिक शैलीत ही कथा गुंफली जाते. 'धर्म बुडत चालला आहे' ही कथा निर्भेळ उपरोध–उपहासाचा नमुना. तानाशा व बानाशा या दोन खानदानी (!) फकिरांचं व एकमेकाना चुकवून एका आंधळया भिकारणीशी लगा लावण्याच्या त्याच्या धडपडीचं व धावपळीचं मोठं उपरोधिक व उपहासगर्भ चित्र इथे पहावयास मिळते.

### शैलीची काही वैशिष्ट्ये

कलाकृती प्रतीत होते, जाणवते ती एक संपूर्ण व सजीव वस्तु म्हणून. परन्तु तिच्या असाधारणतेची चर्चा करताना तिच्या अंगोपांगांचा स्वतंत्रपणे व अलगपणे विचार करणे क्रमप्राप्त असते. भाषा हेही अनुभवाचे एक वाहन असल्यामुळे तिचं कलावंत निर्विशेष असं एक रूप बनत जातं. कलावंताच्या अनुभवाच्या व अभिव्यक्तीच्या स्वरूपावरून तिला एक विशिष्ट आकार येत जातो, विशिष्ट शब्दकळा प्राप्त होते. अनुभवाच्या स्वरूपावरून ती प्रतीक-प्रतीमाप्रधान, रुक्ष वा रसाळ, प्रवाही व प्रासादिक बनत जाते. तिची आंतरिक लय व तोल ठरत जातो. वी. रघुनाथ आपला आशय पुष्कळदा प्रतीकांच्या साह्याने व्यक्त करतात. आकाश, कुत्रे, खाटकाची गाय ही कथा शीर्षके तर प्रतीकेच आहेत. "पुत्रवती झाल्यामुळे तिच्या शरीरातला ताठरपणा लिबलिबीत पण रसाळ झाला होता........मुसमुस मावळून नुसती ओलसर गर्द टवटवी भरली होती" या पूर्वीच आलेल्या अवतरणात प्रसरणशील शब्द वापरण्याच्या त्यांच्या सामर्थ्याचा प्रत्यय येतो. 'तळ्यात धड ना पाऊस पडत होता, ना आकाशचं बिंब चमकत होतं.' "कामांध रजनीच्या धक्क्याने विझलेले सूर्याचे दिवटे," "यौवनानं शिगोशिग भरलेला घडा कुणासाठी घटका टाकीत बसला आहे," "ओल्या बाळंतिणीसारखं ओलसर हिरवं रम्य शिवार," "दिवसावर डोळे मिटून बसलेले दिवे," अशी अनेक वाक्ये बोलक्या प्रतिमामुळे व भाषेच्या डौलामुळे ध्यानात राहतात. उर्दू शब्दांचा वापर मुस्लिम समाजासंबंधी लिहिताना अपरिहार्यच होता. 'सरितौघ नताग्र, सपुलक' असे जरा ज्यादा संस्कृत शब्द खटकतात. काही ठिकाणी पाल्हाळ विशेषतः कथेच्या सुरुवातीस जाणवतो. क्वचित् लेखक मध्येच डोकावून भाष्य करतो. पण अशी स्थळे थोडी आहेत. बहुतेक कथा प्रसग व घटना व त्यामागे असलेली व्यक्तिमने यांच्या संबंधातून, संघर्षातून निर्माण झालेल्या आहेत व त्या सरळ, सीध्या पद्धतीनं सांगितल्या आहेत. संवादापेक्षा निवेदनावर भिस्त अधिक व तेही प्रवाही व सुगम असे आहे.

कुठलीही कलाकृति ही एक सलग व एकसंध वस्तु असली तरी तिचे विश्लेपण करताना तिच्याशी एकरूप असलेले घटक वेगळे करून पहावे लागतात. अशा विलग घटकांची गोळाबेरीज म्हणजे कलाकृति नव्हे हे तर खरेच. या घटकाना एकरस, एकजीव ठेवणारे सूत्र त्या कलाकृतीचे प्राणतत्व होय. आपल्याला आवडलेल्या कलाकृतीची मीमांसा करूनही तिच्या या प्राणतत्वापर्यन्त आपल्याला पोचता आलेले नाही असे वाटत रहाते. या घटकांच्या मागे असलेल्या जिवंत अनुभूतीचे स्पंदन नुसते जाणवते, पण ते चिमटीत पकडता येत नाही. वी. रघुनाथांच्या कथांच्या बाबतीतही याचा प्रत्यय येतो. चांगल्या साहित्याकडे आपण पुन्हा पुन्हा वळतो त्याचे रहस्य कदाचित् हेच असावे. साहित्याच्या श्रेष्ठतेचे हे गमक असेल तर वी. रघुनाथ हे एक श्रेष्ठ साहित्यिक आहेत असे म्हटले पाहिजे.

### एक संदर्भ

'मिटलेले आकाश' या नावाने वी. रघुनाथांच्या प्रातिनिधिक कथांचा जो संग्रह अलिकडे प्रकाशित झाला आहे, त्या निमित्तानेच त्यांच्या कथांची थोडीफार चर्चा आज चाललेली आहे. या कथासंग्रहात समाविष्ट केलेल्या कथांची निवड व्यक्तिगत रुचिवैचित्र्य सोडले तर बव्हंशी समाधानकारक आहे. वी. रघुनाथांच्या अनुभवविश्वाची विविधता व पैस दाखविणाऱ्या व कथाकार म्हणून त्यांचा विकास दाखविणाऱ्या कथांची निवड सुयोग्यच म्हटली पाहिजे. 'लंगड्याची दौलत', 'धर्म बुडत चालला आहे,' 'मुरळी' यासारख्या कथांचा या संग्रहात समावेश व्हायला हवा होता असे वाटते. मते व मतभेद याना वाव असलेला हा प्रश्न असल्यामुळे त्याची केवळ नोंद पुरेशी आहे. वी. रघुनाथानी आपल्या काही कथांतून उर्दूचे व अन्य काही शब्दांचेही इंग्रजी पर्याय कंसात दिलेले आहेत. मराठवाड्याबाहेरील मराठी वाचकांच्या सोयीसाठी त्यावेळी ते आवश्यक असावे. परन्तु त्यानी स्वतःही ही पद्धती सर्वत्र अवलंबिलेली नाही. एकरूपतेसाठी आवश्यक तिथे अशा कंसाना चाट द्यायला हरकत नव्हती. पुस्तकात मुद्रणदोष क्वचित असले तरी ते अनर्थकारक नाहीत. 'नागझरीचे पाटील' या कथेत' "संगीन मुकद्मा" याऐवजी 'संगीत मुकद्मा' असे छापले गेले आहे. एवढा एकच अपवाद दिसतो. 'मिटलेले आकाश' हे संग्रहाला दिलेले नावही सुंदर व अर्थपूर्ण आहे, व प्रा. भगवन्त देशमुख यांची प्रदीर्घ व विवेचक प्रस्तावनाही त्याला जोडलेली आहे. हा संग्रह वी. रघुनाथ यांच्या मृत्युनंतर बारा वर्षांनी प्रकाशित होत आहे. परिशिष्टात त्यांचा जीवनपट व पुस्तकांची संपूर्ण यादी दिली असती तर बरे झाले असते.

●●●






।।ह।।। हा गैरसमज नसलेला कथाकार. एवढा एक दोष सोडला तर लेखकाला आवश्यक असलेले बरेच गुण आहेत. त्यात ग्रामीण जीवन कलंदरतेनं आणि कलात्मकतेनं टीपणं हे विशेष. प्रस्तुत अंकातल्या वात्रटिका आणि ग्रामीणिका याच्या. असा हा लेखक 'अजून'चा बुजरा आहे असं म्हटल्यास विश्वास बसणार नाही—

१ फळीं-फुलांचा सुवास—काटेहि

२ वात्रटिका – ग्रामीणिका

# फणस



"तुज्या वायली, गुमान बसाया काय घेशील?" असं म्हणत धनाजीनं दातओठ खात काठी भूईवर झोडपली न् तो वकिलाकडं फळं घेऊन निघाला. दोनच फळं पण जीवप्यार असलेली....घागरीगत मोठी नि टंच....

**नां**दवडे—

चंदगड तालुक्यातील आडवळणावरलं खेडं. फणसासाठी पुऱ्या तालुक्यात महशूर आहे. कुडचीची चवदार वांगी जशी नावाजली आहेत तशीच नांदवड्याच्या मधाळ फणसाची ख्याती आहे. केवड्याच्या रंगाच्या मऱ्याची पाकळी जिभेवर ठेवताक्षणीच मध पाझरावा तो नांदवड्याच्या फणसानंच! नांदवड्याचं हे वैशिष्ट्य हिरावून घेण्याचा आजवर कित्येकानी आटापीटा केला. कोणी नांदवड्याचं अस्सल फणसाचं वीज आसमंतातील ग्रामस्थानी रुजवून पाहिलं. कोणी तेथली फणसाची रोपटी मुद्दाम पैदा करून आपापल्या गावी लावून पाहिली. तथापि, नांदवड्याच्या फणसाच्या तोडीचं फळ कोठेच धरलं नाही. काही हौशी शेतकऱ्यानी आपल्या भूमीत नांदवड्याची मातीदेखील गाड्यानी उपसून नेली. पण नांदवड्याचा फणस—'ह्या समान हाच'! हेच खरे ठरले.

"निसता माटीचा गुन फकस्त काय उपेगाचा! नांदोड्याची हवापानीबी काय कमती ब्येस हाय! ती आमच्या गावास्नी कंची आनायची?" असं म्हणत अनुभवानं नांदवड्याचा फणस रुजवायचा नाद तालुक्यातील शेतकऱ्यानी सोडून दिला होता.

अवंदा उशीरानं का होईना, नांदवड्याचा फणस झोकबाज बहरला होता. लुसलुशीत कुयऱ्यानी झाडं भारावली होती. काटेवाळकाच्या वेलीवर पिवळ्याशार मिडी लगडाव्या तशा नांदवड्याच्या फणसावर मायंदाळ कोवळी फळं दिसू लागली. मधाळ फळं चाखायचा हंगाम लवकरच येणार म्हणून गावकरी खुशीत होते. फणसापायी भल्यामोठ्यांचे पाय गावाला लागणार आन निदान दोन महिने तरी नांदवडं गाजणार हे आता ठरून गेलं.

बागवान झाडं खंडून मागायला अहमहमिकेनं गावी येणार होते. पण, कसचं काय नि कसचं काय! वैशाखाचं उन्ह झणकलं, तसं, एकाच वळवाच्या पावसानं सवंध नांदवडं झोडपून काढलं. कधी नव्हत्या त्या लिंबाएवढ्या गारानं गावावर छडीमार केला. फार तर दीड घंटाभर! फणसाची झाडं सुसाट वाऱ्याच्या फटक्या-सरशी भेगाळली. काळ्या कुळकुळीत खोडावरल्या साली ढेपाळल्या नि आतील काथेच्या रंगाच्या खपल्या बाहेर आल्या. वऱ्याचशा कुयऱ्या गळून भूईवर क्षेप घेवू लागल्या. अपरंपार कुय-ऱ्यानी नटलेले गरगरीत फणस खिनभरात ओकेओके दिसू लागले नुकतेच विधवापण आलेल्या रांडमुंडरीगत! भरघोस पिकाची आशा दुरावली होती. सवंध नांदवडं हळहळलं. शेदोनशे रुपये फणसाच्या उत्पन्नाची आशा करणाऱ्या धनाजीचंही अवसान गळालं. मोराच्या पिसाऱ्यातील पंखे उधळल्यागत आपल्या डोळ्या-देखत शिवारातील डेरेदार फणसाची वाताहत लागलेली पाहून त्याच्या काळजात चर्र झालं. सुंद मनानं बराच वेळ तो खोपीत गुडघेमिठ्ठी घालून बसला. पोटात केळी कालवल्यागत तो कष्टी झाला. अमळशानं धनाजी खोपीबाहेर सरला आन,

"त्येच्या बायली ह्या पावसाच्या!" अशी शिवी हासडत त्यानं एक काळाकरंद धोंडा घेवून हवेत भिरकाटला. डोईला गोरव घालून गावठाणाकडं निघालेल्या बसवंत लोहाराला धनाजीची पोराटकी बघून हसू आलं.

"काय धना, येरवाळीच गोपन चालवलीया जनु!"

"मानं काय करू बसवंता, पावसानं समदा फनसाचा विस्कोट केला. तंव्वा, कावदारून हानला योक धोंडा आभाळाच्या टकुऱ्यात. अवंदा पीकाची लय आशा व्हती गाऽ. फनस वोपून शेदोनसं रुपय गावनार होतं, वक्किलाची फी भागनार व्हती...."

"कंचा वक्कील ठेवला हायीस गाऽऽऽ ?"

"व्येळगावचं 'पानशा' वक्कील म्हणून बोलत्यात नव्हं, त्येंच्याकडं वक्कीलपत्तर दिलया."

"वक्कीलमातुर झ्याक हुडीकल्यास धना," बसवंतानं डोईचं गोरव कूडाला टेकवलं.

"सरपंचानं गाठ घालून दिला नव्हं? त्येनीच चिट्टी लिवून देली तंव्वा वक्कीलपत्तर त्यानं धरलं."

"पानशा वक्कील लय बेरका हाय कामात. फीसाटनं त्वांड सोडून आरवट–चारवट बोलंना, पर इरुद्द बाजूला कंदी सामील होनारं नव्हं. करास करतानं बाघावानी उभारतुया भाइर.... डोळ्याला डोळं लावून फणा मारल्यागत साक्षीदारास्नी आक्शी येडब्याडून सोडतोया गाऽऽ..............खुळं म्हनलं म्हंजे ओ म्हननारं बाजी, पानशाफुडं झीट येवून पडंल....तुजं काम फत्ते व्हनारच....." तळहातावरची तंबाखू चुन्याशी एकजीव करत बसवंत खोपीच्या जाप्त्यात सप्पय बसला.

"त्ये समदं तुज्या बोलापरमाणं व्हईल बसवंता, पर नकानं बाजी म्हंजे काय माजा दुस्मान हाय? कुनी कायबी म्हनंल, पर त्यो माजा पाटीवरला भाऊच नव्हं? शिवाराची निम्मानिम्म वाटणी करून द्याया म्या काय न्हाई म्हनलं?"

"व्हय गाऽ, मागनं घोडं कुटं तटलं?" तंबाखूची चिमूट दाढवणात सारून बसवंत विचारू लागला.

"शिवारातलं फनसाचं झाड हाय नव्हं? त्ये ज्या पट्टीत यील ती पट्टीच म्या द्याया होवी म्हनून बाजीचा हट्ट हाय... म्या म्हनलं फनसाचं झाड समायिकात ठेवा....त्येला बाजीची कबुली न्हाई........गरामपंचायतीची बैटक मांडून गुजेवानी डोळं करून ताट उठला गडी, आन् कोरटात वाटणीचा डावा मांडून, माज सरकाराचं शमगम लावलं.......अनं ह्यातूर माजी कंची चुकी हाय तुयाच सांग बसवंताऽऽ"

"खऱ्याची दुनया आजकाल न्हाई म्हनल्यात." दोन बोटाच्या बेचकीतून पिंक टाकत बसवंत बोलला.

"तुज्या त्वांडानं बोल्लास म्हनून बरंपना यील गाऽऽ. वाडल्या संसाराची आबदा करूनबी दरसाल बाजीन त्याच्या हिश्शाचं अडीशे रुपय पोस्टानं पाठवून देत आलोया म्या. समद्या पावल्या वक्कीलासंगट ठेवल्यात. आज धावरसं कंदीबी ह्यो नेम चुकल्याला न्हाई.........."

"आमास्नी समदं दकल हाय धना, पर ह्यो बाजी उरफाटी खोबडीचा उपजलं आसंमातुर तर्कतिदिकून न्हाई."

"शिगम्याकडं म्हमईसून बाजी घरला आल्या वक्ताला, सागूती–कोंब्याचं तिखाट जेवाण घातलया म्या.....निवऱ्या-पोळीची गाॅडध्वाड जेवणं घातल्यात.....अत्तं बोलु नव्हं, पन इपय निगाला तंव्वा सांगतो गाऽऽ.....माज्या पदराला ही सा लेकरं हायीत....त्यासनी म्हमईसून कंदी त्येनं धडुत्यास कापडं आनल्यात? माघारनीस कंदी सावलं आनलं न्हाई की पोरासनी खेळाया चंडुभावली दिकून दावली न्हाई...हाताला मोळं मारल्यात जनु....." धनाचे डोळे पाणावले. डोळ्याचं खारं पाणी जसं झरझरलं तसं धोतराच्या सोग्यानं तोंड पुसत धनाजी सांगू लागला,

"समदं – हाटगाडगं उरफाटी कसं झालं बग...संक्रातीच्या सणाकडं बाजी अवंदा म्हमईसून येला. त्यो पहिला छूट म्हनला गिरनीची नोकरी सुटली. म्या म्हनलं, नसंना नोकरी, घरची शेती माज्यासकट कर....पर, शयेरगांवचं पानी पिलेला गडी त्यो, त्येचं शिवारांत कंचं मन करमनार ? आल्यापासनं कीटपीट कराया लागला आन् फनसाचं वक्कळ फूल बगूनशान डोमक्यात कीडा उटल्यागत वाटणी होवी म्हनून लय तंडलं. त्येच्या नंदरेत ह्यो फनस लय भरलाय्. माज म्हनतुया 'फनसावर धनादा लय उड्या मारतुया !' त्येनंच बसवंता फनसाला दिरीष्ट लावली."

"धना कायबी म्हन, पर, तुजा फनसबी नकशिनराबानो लय गुनी हाय ही गोटमातुर खोटी न्हाई. अत्तं तयाच ...








अनुक्रमणिका

तुज्या फनसाचं गरं हापूस अंब्याच्या रंगागत ! गावकीतल्या समद्या गऱ्याभितूरली गोटी कुऱ्याच्या अंडकुलीपरमानं टप्पुरी निगती. पर तुज्या फनसाची गोटी लय झालंतर जांवळाच्या बीगत धाकली असती. . . . . . . "

"व्हय, व्हय ! पर झाड समायिकात–हावं असं म्या म्हनलं नव्हं ? माजं बोल बाजीनं काय म्हणून झटकून लावलं ?"

"तुजं नाव आड येतया, धनाऽऽ...तुजं झाड धन्याचा फणस म्हनून वळकत्यात ! नांदोड्याचं न्हानथोर काय म्हनत्यात ? 'पाव्हणं नांदोडचाला येवा, धन्याचा फनस खावून वगा मेवा...' तुज्या नावाची परशीद्दी बाजीच्या डोळ्यावर येतीया म्हनून त्येचं प्वाट चावतय्. कायबी म्हन, तुज्या फनसाची जातच काई येगळी हाय. जिभंवर गरा धरला म्हंजे त्वांडभर मद चळचळतुया. गऱ्याची पाकळी दिकून वल्ल्या खोबऱ्याच्या कातळीगत लागतीया. बाजीचा झाडावर डोळा हाय त्यो ह्या वाजिद्या फनसापायी. धना, माज योक चकोट फळ होव हां....न्हाईतर आयीन वकतास इसारशील..." असं म्हणत बसवंत गोरव घेवून उठला.

"आरं मर्दा, झाडास फळं धराया अवदी हाय अजून. फळाचं वाटाप करतानं तुज्या नावावर योक फळ लावीन गा, देवाच्या किरपेनं फळंमातुर धराया होवी. अत्तंपासनं फनसाचं लय सांगावं आल्यात... रेंजरास दोन फळं होवी म्हनं. . . सरपंचास योकतरी फनस होवा म्हनून त्येंचा पेशल निरुप हाय. . . तलाटीबी झाडावर नंदर ठेवून हाय. . . कुगले धरायआदीच समदी मागनी बोलत्यात. . . . . "

"बाकीच्यांचं कायबी कर धना, पर माज्या पदरात अवंदा योक फनस बांद बाबा. कज्जात साक्षीपाक्षी लागल तव्वा म्या हाय म्होरं" असं सांगून बसवंत जायला निघाला तेव्हा त्याच्या बखोटचाला धरून धनाजीनं त्याला भूईवर बसवलं.

"जाशील म्हनं वाडूळभर बसून. लय दीसानं घरला आल्यासारकं उल्लासा च्या घेवून जा गाऽऽ"–असं म्हणत धनाजीनं पुन्यांदा कज्जाचा विषय काढला.

"ह्या वाटनीच्या डाव्यापायी चिंतागती हाय म्या. कोरटासून शमणस लागल्याधरनं न्याट झ्वॉपसुदिक न्हाई बसवंता,. . . ."

"लय भीतरलंड हायीस आन् काय ? पानश्या वकिलानं बाजीच्या कज्जाची न्हाय भाजी केली तर माजी मिशी कातरून दीन तुज्या हातात" गलमिशा कुरवाळून बसवंतानं धनाजीला धिरावा दिला.

'वक्किलानबी त्येच सांगितलं गाऽऽ.... पर डावा आपल्यासारका व्हनार म्हनून बाजी गावभर सांगत फिरतुया नव्हं ?"

"अगा, जोड धरल्ला पैलवान आपुन कंदी चित होनार म्हनून सांगतुया ? तुया वकिलावर इस्वासान र्‍हा म्हंजे झालं... त्येंची फीबी यवस्तसीर पोचीव. . . म्हंजे वक्कीलबी इरसरीस पेटून लढत्यात. व्हय, धना, पर फीचा ठराव काय झालाय् ?" बशीतील चहाचे भुरके घेत बसवंतानं सवाल केला.








"दोनसं रुपयं ठरल्यात. कागजपतरासाटनं पन्नास रुपय दिल्यान. मिरगाच्या आदी दोनसं रुपय फीची रकम पोचती कराया होवी. तसा वक्कीलास्नी म्या वायदा घेला ह्या फनसाच्या जीवावर. पन् बक्कळ पीकाची ह्या पावसानं आशामोड केली नव्हं ?"

"फीची रकम थोडी थोडी करुन भागवशील म्हनं, पर जीव घान टाकूनबी रकम उभी कराया होवी. . . न्हाईतर पानश्या वक्कील काईबाई बोलतुया गाऽऽ, तंव्हा फीच्या जोडणीत न्हा म्हंजे झालं. अत्तं येतो धना, लय येळ झाला," असं म्हणत बसवंत खेटराचे नाल खरडत घरच्या वाटेला लागला.

☆ ☆

**ज्येष्ठ** महिना लागायला धन्याच्या डेरेदार फणसाला दोनच बुलंद फळं दिसू लागली. भुरट्यांनी फळं लांबवू नये म्हणून धनाजीनं झाडावर राखण ठेवली होती. बुंध्याभोवताली काटेरी कुंपण लावलं. आळीपाळीनं त्याची लेकरं झाडावर पाळत ठेवू लागली. कळत्या कीसनापासून ते तहत बोबडं बोलणाऱ्या शेवंतीपर्यंत. फळं पिकून आपल्या तोंडी केव्हा पडतात असे त्याना झाले. एक फळ घरी खावून दुसरं फळ गुड्डेवाडीला आपल्या माहेरी पोचवायचं लेकरांच्या आईनं—देवकीनं ठरविलं. फळं दोनच लागली खरी. पण आकारानं घागरीगत मोठ्ठी नि टंच दिसू लागली. धनाजीचा पानसे वकिलावर जीव होता. आपला कज्जा पानसे जिद्दीनं लढविणार ह्याची त्याची पक्की खात्री होती. आपली भेट म्हणून फणसाचं एक फळ पानसे वकिलाना द्यायचं त्यानं ठरविलं. उन्हाचा वणवा जसा रणरणला तशी ती फळं पिकायच्या बेताला आली. वटपुनव यायला फणसाचा खमंग वास दरवळला. लगालगा फणसाच्या झाडाला जोहार घालून नि मग हाताच्या पंजावर थुंकून धनाजी नगातगा फणसावर चढला. कमरेच्या कोंगळ्यानं त्यानं फळं आबादान तोडली. दोरखंडाच्या फासात फणस अडकवून ती फळं आस्ते खाली उभा असलेल्या कीसनाच्या हवाली केली. धनाजीला झेंड फुटला. फणसाचा शेंडा गाठून फळं काढताना त्याला धाप लागली. भूईवर उडी घेताच, त्याच्या गळ्याची गोटी बराच वेळ खालवर होव लागली. दोन फळांपैकी एक भलतंच मोठ्ठं होतं. शेतकी प्रदर्शनात ठेवण्याच्या लायकीचं. मारवाड्याच्या दोंदल्या ढेरीलाही लाजवील इतकं ते दांडगं फळ धनाजीच्या हाताला तोलवेना. धनाजीनं त्याच्यावर टिचक्या मारल्या. 'ढब्. . . ढब्' आवाज येताच जीवणी कानाला लागेतोवर तो हसला आन् लागोलाग त्यानं हाळी दिली,

"अस्तुरे, योक चील आन बिगीबिगी"

"येरवाळी कशापायी होवं चील ?" देवकी ठिसकारली.

"ह्यो येवडा फनस वकीलास्नी पोचवीन म्हनतो".

"त्यासनी काय कमती हाय म्हनतो म्या ? अवो, रगड फनसं-कनसं देनारे हायीत त्यास्नी !"

"पन् पेरमाची भेट म्हनून ह्यो नांदोड्याचा माजा फनस द्याची विच्छा हाय माजी."

"मानं द्येवा गावानला योक. लय फनस वोपनारं हायीत. पर.. ह्यो चकोट फनस कुनाच्या बालाबी हात लावाया द्याची न्हाई म्या. गुड्डेवाडीस भावाकडं फनस द्याचा इचार हाय माजा. . . ."

"डोळं वर करुनशान कुनाचं बा वर काडतीयास गे, कौटाळणी?

वादाडात ठेवून दिलं म्हंजे व्हयील दकल ! म्हनं थेवा गावातला योक. . . . म्यावी म्हंतो, तुया गावातला फनस आनूनशान भावाच्या मुड्यावर काय म्हनून आवळत न्हाईस ?"

"माज्या भ्रावाचं मुडदं काय म्हनून वर काडतासा ? जेनं खटलं करून कोरट-वकील दावलं त्या भावाचा मुडदा आवळा आदी." देवकी वर्मावर वोट ठेवत ठिसकारली.

"तुज्या वायली, गुमान बसाया काय घेशील ?" असं म्हणत दातओठ खावून हातातली काठी धनाजीनं भूईवर जोरानं झोडपली.

आईबापाचा गोमगाला ऐकून धनाजीची लेकरं गप्पगार झाली. कळता झालेल्या कीसनानं डोळं गाळणाऱ्या आईला खोपीच्या आतल्या जाप्त्यात नेवून वसवलं. अमळशानं धनाजी सिमिटाच्या चिलातलं फणसाचं ओझं डोईवर घेवून वेळगावला जायला निघाला. पांदीतून वाट कापत 'येसटी'ची डांबरी सडक गाठण्यासाठी धनाजी तरातरा चालला. आन सडक गाठण्यापूर्वीच कीसना धुमाट पळत आला आन् आयेनं दिलेलं भाकरीचं गठुळं त्यानं वापाच्या हवाली केलं.

"लय व्येस कामगिरी झाली पोरा, सांच्यापारी येतो म्हनावं आयेला, तव्वर काडल्याला दुसरा फनस समदी खावून घ्या म्हनावं." धनाजीनं निरोप दिला.

'येसटी'तून उतरताच धनाजीनं वकिलाचं घर गाठलं. फणसाच्या ओझ्यानं जीव फेसाटीला आला होता. घशाला कोरड लागली होती. पानशे वकिलाचं ऑफिस पक्षकारानी फुललेलं होतं. टेवलाशी बसून पानशे कागदपत्र चाळत होते. उजव्या हातालगत वसलेल्या कारकूनाला मसुदा सांगत होत. दुतर्फा खेडूत पक्षकार आदवीनं वाकड्यावर वसले होते. ऑफिसच्या वाहेरच्या पडवीत काही पक्षकार चिलीम फुलवीत होते. ऑफिसात आबदारपणानं धनाजीनं पाऊल टाकलं आन् वकिलाना रामराम घातला. रामराम स्वीका-रायला त्याना अवधी नव्हता. पक्षकार नोटा मोजत होते. फी चुकता करण्यात कसूर करणाऱ्या पक्षकाराशी वकील खेंस मारून वोलत होते.

"पुढल्या मुदतीला फीचे पैसे आले नाहीत तर तुमचे कागदपत्र फेकून देईन !" त्यानी एका चॅप्टर केसमधील पक्षकाराला नुकतेच डाफरले. धनाजी सगळं वेजवार निरखत होता. तास लोटला तरी, त्याची कोणी दाद घेत नव्हतं. एक जागी वसून त्याची हाडं अवघडली. मोका साधून, धनाजी हळू हळू पुढे सरकत कारकूनाच्या कानाशी लागला तशी सवागती पानश्यांची नजर धनाजीवर गेली,

"काय नांदवडेकर, कानगोष्टी कसल्या करताय् ? झाली का फीची जोडणी ?"

"न्हायजी, शवुद दिल्यासारकं जमाया न्हाई रावसाव....उल्ली-सारकी जोडणी झाली. . . ह्या आडोळ्या पावसानं समदं फनसाचं पीक नासवलं रावसाव. . . .कायवी करून वीस रुपय आनल्यात तेवडं जमा करावं रावसाव. . . पुडल्या वकताला समदी फी भागवितो... संवाळून घ्येवा योक डाव....." असं म्हणत धनाजीनं टेवलावर नोटा ठेवल्या.

"अडाण्याची संगत करून वकीलपत्र घातलं तेव्हाच आम्ही मूर्ख ठरलो ! आधी गुंतू नये अन् मागनं. . . . ."

"तसं नगं म्हणू रावसाव. . . फणस विकून वेजमी करणारा गडी म्या, पन् ह्या पावसानं समदा घात केला जी ऽऽ, म्हनून कमाईचा विस्कोट झाला....पुन्यांदा फीची खोटी करनार न्हाई. . . आन रावसाव, येवडं गरिवाचं फळ घ्यावं. . . लय झ्याक हाय फनस अक्शी मदासारका ग्वाड...." धनाजीनं फणस पानश्यांच्या खुर्चीलगत ठेवला. ऑफीस फणसाच्या वासानं दरवळून निघालं.

"ठेवून द्या सांदरीत. असले खूप फणस पाहिलेत. वकिलानं फीचा तगादा लावू नये म्हणून त्याना खूश करण्यासाठी चांगल्या युक्त्या-प्रयुक्त्या योजता तुम्ही खेडूत ! कोणा लेकाला इथं फणस आवड-तात ? असले फणस खावून पोटदुखीमात्र व्हायची. . . ."

"असं नगं म्हनू रावसाव. नांदोड्याचा ह्यो कापा फनस योक डाव खावून वघावं महाराज, माजं नाव जलमभर निगंल घरामदी. . "
धनाजी आजीजीनं सांगू लागला.

"वरं, वरं, पुढल्या मुदतीला वाकी फीची रक्कम एक टाकी चुकता हवी. नाहीतर वकीलपत्र रद्द करावं लागेल ! काय समजलं ?"

"जी रावसाव, कबुली हाय" असं म्हणत धनाजी उठला नि ऑफी-सच्या वाहेरील पडवीत वसून त्यानं भाकरीचं गठुळं सोडलं. कुळथ्याची उसळ व्येस जमली होती. धनाजीला घास नीट गिळवत नव्हते. घासटे नरड्यापर्यंत जावून माघारी फिरू लागले. पाण्याच्या घोटाच्या आधारानं त्यानं कशीवशी न्याहरी उरकली. पुढच्या मुदतीच्या तारखेची चिठ्ठी घेण्यासाठी तो ऑफीसमध्ये परत आदवीनं शिरला. पानशे वकील मोलकरणीला हाका मारत होते. मोलकरीण खाल-मुंडीनं ऑफीसात येताच ते तिला म्हणाले,

"काशीबाई, त्या सांदरीतला तो फणस उचल आधी. अन् घेवून जा तुझ्या घरी. आमच्या पक्षकाराच्या नांवानं खावून टाका तो फणस !" असं म्हणत पानश्यांनी चष्म्याच्या जाड भिंगातून तिरप्या नजरेनं धनाजीकडं पाहिलं.

●●●


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



साहित्यिक म्हणून एक अज्ञात इसम. जसे साहित्य स्वतः विकत घेऊन वाचेल (काय हे?) तसे साहित्य न विकण्याकरता लिहील. (अहो, नवल!) पण यात कुठे तरी साहित्य निर्मितीने आळसा-बरोबर सोबत केली. अर्थात् 'अजून'चे धक्के खावे लागत आहेत. कोषातून बाहेर पडत आहे.....

ज. रा. ९१५३

१. आरोपीत जीवन
२. कविता

# आ शे चा पू ल





**जीवनाचं प्रवाहित्व....बाजूला इतिहासाची साक्ष देणारा, काळाला आव्हान देऊन उभा असलेला किल्ला आणि संथपणे वाहणारा तापीचा प्रवाह. या जीवनौघावर जो पूल आहे तोच 'आशेचा पूल'—**

त्या दिवशी विषण्ण मनाने एककल्लीपणे, एका आडरस्त्याने मी गांधी बागेकडे जात असता आकस्मिकपणे रस्त्यावर वाकलेल्या पारिजातकाच्या फुलानी अलगदपणे माझ्या अंगावर उडी घेतली. मी किंचित् हलल्याचे पाहून ती हंसत हंसत मला म्हणाली होती, आमच्या जगाकडेहि जरा बघ की! आम्हाला काय राग येत नाही! आम्ही स्वत:वरच रागाऊनसुद्धा अगदी फुरंगटून जातो आणि लाल होतो. पण शेवटी गळून पडताना देखील, देठापासून निघालेल्या रागाचा लाल रंग आमच्या या प्रसन्न हास्यामध्ये वितळून जातो. खरच या हास्यात जीवनाचा उल्हास आहे. गगनाला गवसणी घालू शकेल इतकी सात्विक भावनेची विशालता आहे. जीवनाच्या आशा–निराशेच्या या खेळात इतकं उदास, इतकं निराश, इतकं विषण्ण होण्याचं काहीच कारण नाही तर. आशा-निराशेचा खेळ तर जीवनात प्रत्यही चालूच असतो. आणि आपण आशेचा पूल बांधतो, एक इंद्रधनुष्य रंगवतो, ते केवळ प्रयत्नशील रहाण्यासाठी. त्याच्यावर काही घर करून रहाण्यासाठी नव्हे.

जीवनातील आशेचा पूल.....असेच काही विचार गांधी बागेच्या कठड्यावर बसल्या बसल्या माझ्या मनात येत होते. खाली तापी नदी संथपणे वहात होती. बाजुलाच सुरतेचा प्रसिद्ध किल्ला, उपेक्षित माणसासारखा अंग चोरून उभा होता. रात्र काळोखी होती. रस्त्यावरचे दिवे काळोखाची भयाणता वाढविणारी मळमळ अजून ओकू लागले नव्हते. तेवढ्यातच बाजुलाच असलेल्या होप ब्रिजवरील दिवे—त्या शुभ्र चंद्र प्रकाशी नळ्या—नर्तकी जशी उडी मारून स्थिर रहावी—त्याप्रमाणे त्यांचा प्रकाश प्रथमतः चमकून स्थिरावला.



अनुक्रमणिका